# वऱ्हाडी भाषा
## प्रकृती आणि परंपरा

डॉ. सु. बा. कुळकर्णी

# कोंकणी भाषा प्रकृती आणि परंपरा




लेखक

डॉ. सु. बा. कुळकर्णी

कोंकणी भाषा
प्रकृती आणि परंपरा
(मराठी)

भाषाशास्त्र
स्व. डॉ. सु. बा. कुळकर्णी

प्रकाशन क्र. 99



पयली आवृत्ती :
2007

उजवाडावपी :
ज्योसिनो वाझ
सचिव, गोवा कोंकणी अकादेमी
243, पाटो कॉलनी
पणजी गोंय, 403 001

मुखचित्र :
श्रीधर कामत बांबोळकर

छापणावळ
मोर्सोन ग्राफिक्स
बाजार मळ, फोंडे-गोंय-403 001

मोल : रु. १००/-

KONKANI BHASHA :
PRAKRITI ANI PARAMPARA
(Marathi)

Linguistics :
Late Dr. S. B. Kulkarni

Publication No. 99



First Edition :
2007

Publishers :
Joaosinho Vaz
Secretary, Goa Konkani Akademi,
243, Patto Colony,
Panaji, Goa 403 001

Cover :
Shridhar Kamat Bambolkar

Printer :
Morson Graphics
Bazar Mol, Ponda, Goa 403 401.

Price : Rs. 100/-

# अकादेमीच्या वतीने...

कोंकणी भाषेचे स्वतंत्र अस्तित्व सिद्ध करणारे आणखी एक नवीन पुस्तक कोंकणी भाषेच्या इतिहासात रूजू होत आहे. नागपूर विद्यापीठाच्या भाषाशास्त्र व परकीय भाषा विभागाचे माजी प्रमुख, मराठी आणि कोंकणी भाषेचे जाणकार, नामवंत भाषातज्ञ स्वर्गीय डॉ. सु. बा. कुळकर्णी यांचे 'कोंकणी भाषा : प्रकृती आणि परंपरा' हे मराठी पुस्तक गोवा कोंकणी अकादेमीच्या वतीने प्रसिद्ध होत आहे. डॉ. सु. बा. कुळकर्णी यांचे नागपूर येथे राहणारे सुपूत्र श्री. अनिरूद्ध सु. कुळकर्णी यांनी सदर पुस्तक प्रकाशित करण्याचे हक्क गोवा कोंकणी अकादेमीला दिले आहेत. त्या कामी प्रा. भूषण भावे यांचे सहकार्य अकादेमीला लाभले आहे.

डॉ. व्ही. पी. चव्हाण, जर्सन द कुन्हा, डॉ. अ. का. प्रियोळकर, डॉ. जुजे पेरेरा, जे. ए. साल्ढाणा, डॉ. सु. मं. कत्रे, डॉ. आनंद नाडकर्णी आदी विद्वानांनी कोंकणी भाषेसंबंधी शास्त्रीय दृष्ट्या आपापली भूमिका मांडली व तर्क, उदाहरणे इ. च्या आधाराने ती पटवून देण्याचा प्रयत्न केला. ह्याच पंक्तीत डॉ. सु. बा. कुळकर्णी यांच्या शास्त्रीय व चिकित्सक पुस्तकाची भर पडणार आहे.

सदर पुस्तकाचे लेखक डॉ. सुधाकर बाळकृष्ण कुळकर्णी यांचा जन्म कोंकणातील रायगड जिल्ह्यातील तळे गावात 1934 साली झाला. गोमंतकीय थोर इतिहास संशोधक डॉ. अ. का. प्रियोळकर यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी भाषाविज्ञान विषयात अभ्यास सुरू केला. देशांतील अनेक बोली भाषांवर त्यांनी संशोधन केले. 1964 साली त्यांनी महाराष्ट्र, गुजरात, कर्नाटक तसेच गोव्यातील एकूण 16 जिल्ह्यांतील बोली प्रकल्पांवर संशोधन केले. 'डिस्क्रिप्टिव ऍनालिसिस ऑफ कातकरी डायलेक्ट' ह्या विषयावर त्यांनी पी. एच्. डी. संपादन केली. विविध महाविद्यालयांत आणि विद्यापीठांत त्यांनी अधिव्याख्याते, प्रपाठक, डीन म्हणून काम केले. त्यांनी प्रकाशित केलेल्या अनेक पुस्तकांत 'कोंकणी ऑफ काणकोण' ह्या पुस्तकाचा समावेश आहे.

कोंकणी भाषेच्या संदर्भात, कोंकणी ही मराठीची बोली म्हणविणारे तसेच कोंकणीला स्वतंत्र भाषेचा दर्जा देणारे, अशा दोन्ही गटांकडून मुद्दयांपेक्षा गुद्दयांची, अभ्यासापेक्षा अट्टाहासाची, चिकित्सेऐवज़ी चिडाचिडीचीच भूमिका अधिक प्रमाणात मांडण्यात आली.

परंतु 'कोंकणी भाषा : प्रकृती आणि परंपरा' ह्या पुस्तकात भाषा व बोली ठरविण्याचे निकष सांगून लेखकाने कोंकणी ही स्वतंत्र भाषा कशी आहे हे राजभाषा, धर्मभाषा, व्यवहारभाषा, आंतरराष्ट्रीय भाषा, ग्रंथभाषा, बहुजनभाषा, लेखनिविष्टभाषा, आद्यभाषा, उच्चवाङ्मयसृजनशक्ती, संस्कृतिप्रधानभाषा इ. निकषांद्वारे सिद्ध केले आहे.

कोंकणी भाषेचे मूळपीठ, उद्‌गमस्थान, नामाभिधान, तिचा भाषिक विस्तार, भाषाकुल, तिच्यातील कोरीव लेख, मौखिक साहित्याची परंपरा, लिखित साहित्याचा जन्म व विकास इत्यादी विषयांचा परामर्श घेत त्यांनी कोंकणीचे स्वतंत्र अस्तित्व दाखवले आहे. पोर्तुगिजपूर्व, पोर्तुगिजकालीन व स्वातंत्र्योत्तर अशा तीन विभागांत कोंकणी साहित्याचे विभाजन करून, विविध भौगोलिक परिसरात लिहिल्या गेलेल्या व बोलल्या जाणाऱ्या कोंकणी भाषेच्या 'बोलींचे' नमुनेही सप्रमाण दिले आहेत.

प्रस्तुत पुस्तकाच्या शेवटच्या भागात, अस्मितेची समस्या ह्या प्रकरणांत कोंकणीच्या विकासातील अडचणी व वाटा लेखकाने दाखवून दिल्या आहेत.

कोंकणी भाषेच्या संदर्भात मराठीतून लिहिलेले व कोंकणीची बाजू शास्त्रशुद्धपणे मांडणारे हे पहिलेच पुस्तक ठरेल. कोंकणीच्या आतापर्यन्तच्या सर्व विरोधकांच्या मुद्यांचे खंडन प्रस्तुत लेखकाने केले आहे.

फर्मागुडी येथील पी. ई. एस्. कॉलेजचे कोंकणी विभागाचे प्रमुख, कोंकणी समीक्षक आणि गोवा कोंकणी अकादेमीचे माजी उपाध्यक्ष प्रा. भूषण भावे यांनी सदर पुस्तकासाठी एक दीर्घ प्रस्तावना लिहिली आहे. ॲड्. उदय भेंब्रे यांचे बहुमूल्य मार्गदर्शन ह्या पुस्तकासाठी लाभले आहे.

कोंकणी भाषेच्या विकासाच्या दृष्टीने कोंकणी लेखक, वाचक, समीक्षक, हितचिंतक ह्या सर्वांनाच हे पुस्तक प्रेरणादायी ठरणार आहे. मराठी वाचकांनाही कोंकणीची खरी ओळख घडविण्यास हे पुस्तक उपयुक्त ठरणार आहे.

श्री. अनिरूद्ध कुळकर्णी आणि प्रा. भूषण भावे यांची अकादेमी ऋणी आहे.

**पुंडलीक ना. नायक**
अध्यक्ष,गोवा कोंकणी अकादेमी




# प्रस्तावना

## कोंकणी भाषा
## संघर्षातून समृद्धीकडे

**– प्रा. भूषण भावे**

कोंकणी भाषेविषयी शास्त्रशुद्ध भूमिका मांडणारे हल्लीच्या काळातील हे पहिलेवहिले पुस्तक आपल्यासमोर ठेवतांना अत्यंत आनंद होत आहे. कै. सु. बा. कुळकर्णी यांची व माझी एकदाही प्रत्यक्ष भेट झाली नाही. केवळ पत्ररूपाने एकदोनदा आम्ही संवाद साधला. श्रवणबेळगोळ येथील शीलालेखासंबंधी नागपूरच्या दै. तरूण भारत मधील त्यांचा लेख डॉ. श्री. शं. फडके यांच्याकडून प्राप्त झाल्यानंतर डॉ. कुळकर्णी यांना पत्र लिहून त्यासंबंधीची विस्तृत माहिती मिळविली. तेव्हा उलट टपालाद्वारे डॉ. कुळकर्णींनी ती माहिती पुरविली. मधल्या काळात पुन्हा डॉ. कुळकर्णींशी काही संबंध आला नाही. परंतु त्यांनी पाठविलेल्या माहितीत ''कोंकणी भाषा : प्रकृती व परंपरा'' ह्या आगामी पुस्तकाचा संदर्भ होता तो स्मरणात पक्का बसला होता. ते पुस्तक कधी प्रकाशित होणार याची हुरहूर लागली होती.

मध्यंतरी डॉ. कुळकर्णींच्या दु:खद निधनाची बातमी वर्तमानपत्रांतून समजली. पुन्हा एकदा वरील पुस्तकाच्या आठवणी ताज्या झाल्या. त्यांच्या कुटुंबियांना अनेक पत्रे लिहिली ती सर्व पत्ता बदलल्यामुळे परत आली. त्यानंतर गोव्यात व्यवसायानिमित्त असलेल्या श्री. अभय लाहोटे ह्या नागपूरच्या गृहस्थांनी डॉ. सु. बा. कुळकर्णी यांचे चिरंजीव श्री. अनिरूद्ध कुळकर्णी यांचा पत्ता मिळवून दिला. श्री. अनिरूद्ध कुळकर्णी यांनी काही दिवसांतच डॉ. कुळकर्णी यांच्या त्या पुस्तकाचे हस्तलिखित पाठवून दिले. ते हस्तलिखित श्री. पुंडलीक नायक यांना दाखविताक्षणीच त्यांनी ते गोवा कोंकणी अकादमीतर्फे प्रकाशित करण्याची इच्छा प्रकट केली.

हे पुस्तक कोंकणीची बाजू मांडणारे आहे हे खरे. परंतु कोंकणीच्या बाजूने लिहितांना, काही तुरळक अपवाद वगळता, कुठेही अभिनिवेष किंवा अतिशयोक्ती यांच्या आहारी लेखक गेला नाही हे विशेष. एकामागोमाग कोंकणीच्या विरोधातील मुद्यांचा समाचार घेतांना लेखकाने तर्काचा, वस्तुनिष्ठतेचा, इतिहासाचा व वास्तवाचाच केवळ आधार घेतला आहे.

इन्क्विजिशनसारख्या अघोरी, अमानवी व क्रूर हत्यारामुळे पोर्तुगिजांच्या काळात झालेला जुलूम व अत्याचार, ते अत्याचार सहन होईनात म्हणून कोंकणी माणसाने केलेली स्थलांतरणे, त्यामुळे मूळपीठाकडील-गोव्याकडील संबंध तुटणे, एकभाषी समाजाच्या राजकीय विभाजनामुळे भौगोलिक सलगतेचा अभाव, थोपविलेल्या स्थलांतरणाच्या प्रसंगी झालेली ससेहोलपट, स्थलांतरित ठिकाणीही टिपू सुलतानाकडून लादलेला धार्मिक छळ, यावर वरचढ म्हणून 'जे पळून गेले ते सुटले' असे म्हणण्याची पाळी यावी, असे गोमंतकात राहिलेल्या नवधर्मांतरित कोंकणी भाषिकांवर झालेले अनन्वित अत्याचार, अन्यायी खटले व अमानवी शिक्षा, 'भीक नको पण कुत्रे आवर' ह्या धर्तीवर 'भाषा, संस्कृती काही नको, परंतु अत्याचार थांबवा' असा आक्रोश करणारी जनता, ह्या सर्व कारणांमुळे नंतरच्या काळात स्वभाषिकांकडूनच झालेली हेळसांड, दुर्लक्ष, निर्भत्सना, हेटाळणी, इत्यादी आपत्तींतून कोणताही राजाश्रय किंवा संतपरंपरा नसतांना केवळ काही लाख भाषिकांची भाषा जिवंत राहिली, यातून कोंकणी भाषेचा चिवटपणा व लवचिकता सिद्ध होते.

मौखिक साहित्याची प्रदीर्घ व प्राचीन परंपरा कोंकणीला लाभली आहे. ऐतिहासिक दस्ताऐवज पाहता 'मांड' नांवाच्या स्थानांवर धालो, फुगड्यो इ. लोककला 12 व्या शतकापासून चालत असल्यांचा संदर्भ सापडतो. ओवी (जात्यावरील ओव्या, लग्नप्रसंगी- हळदीच्यावेळी, घरभरवणीच्यावेळी म्हणण्याच्या ओव्या, शेतात नडणी, लुवणी, मळणी इ. विविध कष्टांची कामे करत असतांना म्हणावयाच्या ओव्या, असे अनेक प्रकार आजही प्रचलित आहेत). दुल्पद, धालोगीते, फुगडीगीते, जती, नमने, इ. लोकगीते, रणमाले, जागोर, वीरभद्र इ. लोकनाट्ये, धालो, फुगडी, तालगडी, घोडेमोडणी, कळशी, दिवली, कोळी इ. लोकनृत्ये, लोककथा, लोककाव्ये इ. चे स्वरूप व प्रकार पाहिले की मन थक्क होऊन जावे. लोकसंख्येच्या व भौगोलिक मानाने छोट्याश्या प्रदेशात मौखिक साहित्याची एवढी श्रीमंत परंपरा असणे ही अचंबा करण्यासारखीच बाब आहे.

## कोंकणी भाषा : उद्‌गम व विकास (कालानुक्रम)

| | | |
|---|---|---|
| इ. स. 800 ते 1000 | : | कोंकणी भाषेचा बोलीभाषा म्हणून जन्म. (शीलालेखांमधून अक्षरबद्ध) |
| 1000 तें 1200 | : | म्हणी, वाक्‌प्रचार, लोककला, लोकसंगी, लोकनाट्य, लोकगीत, लोककथा..इ. मौखिक-साहित्याचा-लोकवेदाचा जन्म. |
| 1200 ते 1500 | : | संभाव्य काव्ययुग |
| 1500 ते 1600 | : | कृष्णदास शामा व इतर लेखकांचा कालखंड (रामायण, महाभारत यांवर आधारित साहित्यनिर्मिती) |
| 1510 - 1575 | : | कोंकणी समाजाचे स्थलांतरण. |
| 1575 - 1684 | : | पोर्तुगीज कालखंड-ख्रिस्ती धार्मिक साहित्य-निर्मिती. |
| 1684 - 1855 | : | भाषिक बंदीचा कालखंड. भाषेची हेळसांड. भाषिक शून्यकाळ. |
| 1855 - 1961 | : | भाषिक पुनरूत्थानाचा कालखंड. |
| 1961 - 1992 | : | स्वातंत्र्योत्तर कालखंड. सर्जनशील साहित्य-निर्मितीबरोबरीनेच भाषिक चळवळ. |

एवढी मोठी लोकसाहित्याची परंपरा असलेल्या कोंकणी भाषेत कृष्णदास शामा, (गोव्यात इ. स. 15 व्या शतकाची अखेर व 16 व्या शतकाच्या पूर्वार्धात होऊन गेला) ह्या सासष्टीतील लेखकाच्या आगमनापर्यन्त कोणतीच साहित्यनिर्मिती झाली नाही हे मनाला व बुद्धीला पटणारे नाही. ह्याबाबतीत कवीवर्य बा. भ. बोरकर म्हणतात,

‘‘इ. स. च्या 16 व्या शतकात जेव्हा आमच्या धर्मावर व संस्कृतीवर फिरंगी सत्तेचे संकट आले, तेव्हा आमच्या मंदिराबरोबरच तिथे सांभाळून ठेवलेले कोंकणी काव्यग्रंथही जळून भस्मसात झाले. त्यातील काही पाद्री थॉमस स्टीफन्स यांने पाहिलेले असावेत. अन्यथा आपण लिहिलेल्या कोंकणी भाषेच्या व्याकरणाच्या प्रस्तावनेत आपण ते कवी व पुराणकार यांच्या उपयोगी पडावे म्हणून लिहिले आहे, असे त्याने म्हटले नसते. सोळाव्या शतकातील कवी कृष्णदास शामा याने लिहिलेले कोंकणी गद्य पोर्तुगालच्या पुरातत्वखात्यात सापडले आहे. त्या गद्यापूर्वी कोंकणी

काव्याचे एक पर्व होऊन गेले असले पाहिजे. कारण, जगांतील साहित्याचा इतिहास पाहिल्यानंतर एखादी भाषा साहित्यरूप घेत असतांना आधी काव्यातून गाते व नंतर गद्यात बोलते असे चित्र दृष्टीस पडते. कृष्णदास शामाच्या कोंकणी गद्याची धाटणी आजच्या कोंकणीचीच आहे. यावरून तिची धाटणी सोळाव्या शतकातच स्थिर झाली हे स्पष्ट दिसते. मॅक्समुल्लरने एके ठिकाणी म्हटलेय की साहित्याचे एक मोठे पर्व आधी होऊन गेल्याशिवाय भाषेला स्थिरता प्राप्त होत नसते. त्याचा हा सिद्धांत खरा असल्यास, सोळाव्या शतकाच्या दोन तीन शतके पूर्वीच असे एखादे साहित्यपर्व कोंकणीत होऊन गेले असावे. शिलाहार-कदंबांच्या काळांत ते होऊन गेले असण्याची शक्यता आहे.*

अशी लिखित परंपरा ह्या भाषेला होतीच असे सांगणारा अजून एक पुरावा आहे. एच्. व्हान रीडस् ह्या डच संशोधकाने 1668 साली गोमंतकापासून शेकडो मैल दूर असलेल्या मलबार येथे संपादित करून प्रकाशित केलेल्या Hortus Indicus Malabaricus ह्या ग्रंथाची प्रस्तावना, त्या पुस्तकातील माहितीची सत्यता लोकांना पटवून देण्यासाठी, तीन स्थानिक वैद्यांकडून कोंकणी भाषेत लिहून घेतली आहे. ती देवनागरी लिपीमध्ये लिहिली आहे. यावरून गोव्यातच नव्हे तर कर्नाटकातसुद्धा कोंकणी लेखनाची परंपरा 16 - 17 व्या शतकातही होती हे सिद्ध होते.

तॉमे पिरीश ह्या प्रवाश्याचा उल्लेख डॉ. कुळकर्णी यांनी केला आहे, तो मूळातून वाचण्यासारखा आहे.

"Now our road takes us to the magnificent kingdom of Goa, the key to first & second India. The people of this kingdom are strong & prudent. The language spoken in this kingdom in Congani. It does not resemble that of Deccan nor that of Narsinga, but it is a separate language."

हा प्रवासी 1512-1515 दरम्यान गोव्यात होता. यावरून पोर्तुगिज येण्याअगोदरच कोंकणी भाषा अस्तित्वात होती, एवढेच नव्हे तर ती कन्नड व मराठी भाषांपेक्षा वेगळी होती व तिचे ''कोंकणी'' हे नामानिधानही झाले होते हे सिद्ध होते.

जॉन लीडननेही आपल्या कोंकणीतून लिहिलेले भागवतपुराण, लिंगपुराण व थळ (स्थल) पुराण पाहायला मिळाल्याचा उल्लेख केला आहे. यावरून कोंकणी भाषा पोर्तुगीज येण्याअगोदरच नांवारूपाला आली होती याविषयी दुमत राहत नाही. श्रवणबेळगोळ येथील शीलालेखातील

** कोंकणी काव्य-संग्रह (प्रस्तावना) संपादक : बा. भ. बोरकर (साहित्य अकादेमी 1981)*

"श्री चावुण्डराजें करवियलें" व "श्री गंगराजे सुत्ताले करवियले" ह्या दोन ओळी कोंकणी आहेत हे सिद्ध करून डॉ. कुळकर्णी यांनी ह्या मतावर शिक्कामोर्तबच केले आहे.

13-14 व्यां शतकात निर्माण झालेल्या ज्ञानेश्वरी, लीळाचरित्र ह्या दोन मराठी ग्रंथांवर कोंकणी भाषेचा भरपूर प्रभाव पहायला मिळतो. संतांचे सततचे भ्रमण व संतांना भेटण्यासाठीच्या भक्तांच्या वाऱ्या, तसेच लेखनिकांच्या भाषेचा, त्या-त्या ग्रंथावरील प्रभाव यामुळे भाषांची देवाणघेवाण होणे स्वाभाविक होते. गोव्याचा व ह्या संतांचा त्याकाळीही फार संबंध येत असे. त्याकाळातील गोव्याच्या ग्रामीण भागांतील जनसामान्यांची नांवे पाहता ती महाराष्ट्रातील संताची, त्यांच्या देवांची व महाराष्ट्रातील नद्यांची असलेली पहायला मिळतात. (ज्ञानेश्वर, ज्ञानदेव, मुक्ता, नामदेव, विठ्ठल, विठू, पुंडलिक, चंद्रभागा.......आदी). त्यामुळे ज्ञानेश्वरीत कोंकणी शब्दांची रेलचेल दिसते. ह्या विषयावर डॉ. आनंद नाडकर्णी यांनी केलेले "ज्ञानेश्वरीतील लुप्त शब्दांचा कोंकणी बोलीत शोध"* हे संशोधन महत्वाचे आहे.

ज्ञानेश्वरीतील कोंकणी शब्दांचा "कोंकणी" अर्थ लक्षात घेऊन ज्ञानेश्वरी वाचल्यास तिचे आकलन सुलभ होतेच त्याशिवाय रसास्वादही चांगल्या प्रकारे घेता येतो असे सुमारे 300 कोंकणी शब्दांच्या आधारे डॉ. नाडकर्णी यांनी सिद्ध करून दाखवले आहे.

डॉ. कुळकर्णींनी ह्या पुस्तकात दिलेला संत नामदेवाच्या गवळणीचा दाखला मात्र संशयास्पद आहे. ह्या गवळणीची भाषा पाहता ती संत नामदेवांची नव्हे तर 16-17 व्या शतकातील पेडणे/कुडाळ भागातील एखाद्या कवी नामदेवाची असावी असे जे अनुमान डॉ. अ. का. प्रियोळकर यांनी काढले आहे तेच खरे वाटते. डॉ. जुजे पेरैर ह्या विद्वानांनीसुद्धा ह्या कवीचा उल्लेख 'अनामक लोक - कवि' असाच केला आहे.

**कोंकण व कोंकणी :-**

संपूर्ण "कोंकण" ची भाषा कोंकणी नव्हे असे मत डॉ. कुळकर्णी यांनी साधार मांडले आहे आणि ते खरेही आहे. पोर्तुगिजांनी गोमंतकीय हिंदूंना उद्देशून "कोंकणे" हा शब्द वापरला. त्यावरून कोंकण्यांची बोली ती "कोंकणी" असा संकेत रूढ झाला. पोर्तुगिजांनी कोंकणी भाषेचा उल्लेख "कानारी" असाही केला आहे. त्याचे कारण नवधर्मांतरीत गोमंतकियांना पोर्तुगीज "कानारी" असे संबोधत. (कानारी = मागास, असंस्कृत)

** "ज्ञानेश्वरीतील लुप्त शब्दांचा कोंकणी बोलीत शोध" : डॉ. आनंद नाडकर्णी, मराठी संशोधन मंडळ, मुंबई 1981.*

परंतु भौगोलिकदृष्ट्या "कोंकणचा" असलेला एकसंधपणा व बराच काळ काही राजांनी संपूर्ण "कोंकण" प्रदेशावर केलेले अधिपत्य यामुळे "कोंकण" प्रदेशाची भाषा ती "कोंकणी" असे समीकरण रूढ झाले असावे. कोंकणच्या सातही भागात-सातांकोंकणात-(सौराष्ट्र, काठेवाड, बर्बर, करहाट (ठाणा-कुलाबा-रत्नागिरी), गोमंतक (सिंधुदुर्ग-गोवा-कारवार), कर्नाटक (कर्नाटक किनारा), तुलुंग (तुळु भाषिक प्रदेश) व केरळ) कोंकणी भाषिकांचे येणे-जाणे, वाणिज्य-व्यापारी संबंध असल्यामुळेही कदाचित 'कोंकण' व 'कोंकणी' यांच्या मध्ये साधर्म्य निर्माण झाले असावे.

16-17 च्या शतकात धर्म प्रचाराचे साधन म्हणून पोर्तुगीज पाद्रींनी कोंकणीचा व मराठीचाही वापर केला. धर्मप्रचाराच्या कार्यासाठी जरी हा वापर झाला असला तरी त्यामुळे कोंकणी भाषेचे तत्कालीन रूप व स्वरूप लेखनिविष्ट झाले व त्यामुळे आज उपलब्ध होऊ शकले. ह्या पाद्रींनी गोमंतकात पूर्वीपासून प्रचलित असलेले मराठीतील पुराणादी साहित्य अभ्यासले होते. त्या पुराणासारखेच काही साहित्य ख्रिस्ती धर्माचे असावे अशी नवधर्मांतरितांची तीव्र इच्छा होती. म्हणूनच फा. थॉमस स्टीफन्सपासून फा. इनासियु आर्कामोनी पर्यंतच्या पाद्रींनी मराठीतून पद्य रचना केल्या. परंतु त्या पद्य-रचना केवळ काही टक्के सुविद्य व्यक्तिंपर्यंतच पोहोचतील, त्या सामान्यांपर्यंत पोहोचाव्यात म्हणून त्यांनी "ठायीं ठायीं देशीं उतरें घालून कवित्व सोपे केलें." म्हणजेच मूळ मराठी काव्यावर कोंकणी साज चढवला. देशी (कोंकणी) शब्द वापरून काव्य सोपे केले. ह्या उलट पोर्तुगीज पाद्रींनी जे काही काही गद्य रचले ते मात्र सरळ कोंकणीतूनच रचले.

अशाच प्रकारे पोर्तुगीज पाद्रींनी निर्माण केलेल्या सर्व मराठी काव्यांवर कोंकणीचा (शब्दकळा व वाक्यांची रचना) भरपूर प्रभाव दिसतो. मात्र त्यामुळे ते काव्यच कोंकणी आहे असे जे विधान डॉ. सु. बा. कुळकर्णी यांनी केले आहे ते धाडसाचे वाटते.

'हें सर्व मराठिये भासेन लिहिलें आहे. ह्या देसिंचे आं भासांभितुर ही भास परमेश्वराचेआ वस्तु निरोपुंसि योग्य ऐसी दिसली म्हणून, पण सुध मराठी मधिमा लोकांसि नकळे देखुनु, ह्या पुराणाचा पळु बहुतां जनासि सफळु, होऊंसि, काए केलें, मागिलेआं कवेस्वरांची बहुतेकें अवघडें उतरें साडुंनु, सांपुचेयां कवेस्वरांचिये रितुप्रमाणें आणियेकें सोपीं ब्राह्मणाचे भासेचीं उतरें ठाई-ठाई मिसरित करूनु कवित्व सोपे केलें' असे खुद्द थॉमस स्टीफन्स म्हणत असतांना व कुठल्याही पोर्तुगीज पाद्रीच्या मनांत मराठी व कोंकणी ह्या भाषांसंबंधी गोंधळ नसतांना, ख्रिस्तपुराण किंवा पीटरपुराण कोंकणीत लिहिले आहे असे म्हणणे अतिशयोक्तीचे होईल असे

वाटते. त्यामुळे डॉ. कुळकर्णी म्हणतात त्याप्रमाणे ह्या काव्यग्रंथांचे स्वरूप 'घाट कोंकणी तर थाट मराठी', असे नसून 'घाट मराठी व साज कोंकणी' असे आहे.

तीच गोष्ट आर्यांच्या तथाकथित स्थलांतरणाची. भारत देश सर्व वंशांचे व कुळांचे वस्तुसंग्रहालयच आहे असे मॅक्समुल्लर म्हणाला होता. सर्व वंशांच्या व कुळांच्या लोकांची एवढी सरमिसळ इथे झाली आहे, त्यामुळे वांशिक किंवा भाषिक शुद्धतेला येथे कोणतेही स्थान नाही. त्यामुळेच वेगवेगळ्या व एकमेकांपासून सुदूर असलेल्या भाषांमध्येही उच्चारण, नाद, शब्द, वाक्यरचना इ. अनेक बाबतीत साम्य व जवळीक दृष्टीस पडते. कोंकणीच्या बाबतीतही हे खरे आहे. एका बाजूने पूर्वेकडल्या बंगालीकडे नाते सांगतानाच कोंकणी भाषा दुसरीकडे पश्चिमेकडील गुजरातीकडेही साम्य दाखवते. त्याशिवाय दक्षिणेकडील कन्नड, तामीळ, इ. भाषांतील अनेक शब्द कोंकणीमध्ये सहस्त्र वर्षांपासून आहेत हे वेगळेच. आर्य व द्रवीड हे वंशवाचक शब्द आहेत की नाही ह्याविषयी विद्वानांमध्ये मतभेद आहेतच.

कोंकणीचा उगम महाराष्ट्री प्राकृत मधून झाला असे मत डॉ. सु. बा. कुळकर्णी यांनी दिले आहे. कोंकणी भाषेच्या उगमासंबंधी अनेक मते विद्वानांनी व्यक्त केली आहेत. डॉ. सुमित्र मंगेश कत्रे यांनी तिला दक्षिण-पश्चिम गटात समाविष्ट केली आहे. श्री. नागेश सौंदे यांनी कोंकणीचा उगम शौरसेनी अपभ्रंशापासून झाला आहे असे मत दिले आहे. फा. ए. एफ्. एक्स्. माफेय यांनी अनेक बोलींच्या समुच्चयामधून तिचा जन्म झाला असे म्हटले आहे. तर शणै गोंयबाब यांनी तिचे माहेर वैदिक-संस्कृतमध्ये शोधले आहे. श्री. जुजे पैरेर यांनी कोंकणी भाषा महाराष्ट्री प्राकृत मधून जन्मली असे म्हटले आहे. कोंकणीच्या उगमासंदर्भात अधिक अध्ययन व संशोधन होणे गरजेचे आहे. कोंकणी भाषा ही कमी परिवर्तनशील आहे व तिने आपले प्राचीन अवशेष मोठ्या प्रमाणांत राखून ठेवले आहेत असे मत डॉ. कुळकर्णी यांनी दिले आहे, ते वस्तुस्थितीवर आधारित आहे. विशेषत: कोंकणीच्या ख्रिस्ती बोलींत 16-17 व्या शतकातील भाषेची प्राचीन रूपे अजूनही पाहायला मिळतात. याचे कारण हिंदूंच्या भाषेप्रमाणे ख्रिस्ती लोकांच्या भाषेवर इतर भाषांचा प्रभाव न पडता, ती वेगळी, स्वतंत्र व स्वत:च्या कोषात राहिली. त्याचप्रकारे गोमंतकातील कोंकणी भाषा, उर्वरित प्रांतातील कोंकणी भाषेपेक्षा जुनी रूपे टिकवून धरतांना आढळते.

गोमंतकात पोर्तुगीज राजवटीत झालेल्या सांस्कृतिक बदलांचे, स्थित्यंतरणांचे व अभिसरणांचे जे सुंदर चित्र डॉ. कुळकर्णी यांनी रंगविले आहे ते वाचकांनी अवश्य वाचावे. एका रात्रीत धर्म बदलला, कालांतराने चालीरितीही बदलल्या. परंतु पिढ्यान्‌पिढ्यांचे संस्कार व भारतीयत्व मात्र तेच राहिले. त्यामुळे टी. बी. कुन्हा म्हणतात त्याप्रमाणे येथील जनतेच्या राष्ट्रीयत्वाचा

ऱ्हास करण्यात पोर्तुगीज सत्ताधारी काही प्रमाणात यशस्वी झाले असले तरी येथील समाजा पोर्तुगीजांच्या जुलुमाविरुद्ध चिवटपणे लढा दिला, हेही तितकेच खरे. बळजबरीच्या ह्या काळात हिंदू समाजाला मराठी भाषेच्या रूपाने पर्याय होता, तो त्याने स्वीकारला. परंतु धर्मांतरित करून हिंदू समाजापासून तोडलेल्या, वेगळ्या काढलेल्या ख्रिस्ती समाजापुढे कोंकणी व्यतिरिक्त अन्य कोणताही पर्याय नव्हता. त्यामुळे ह्या नवधर्मांतरीत समाजाने कोंकणी भाषेला कवटाळून ठेवली. लादलेल्या पोर्तुगीज भाषेतील व संस्कृतीतील व्याकरण, संगीतादी कलांचे आरोपण कोंकणीवर करतांनाच त्यांनी तिचा जुना बाज राखून ठेवला, मूळ लयकारी जोपासली. त्यातूनच मांडो, देखणी सारखे गीतप्रकार निर्माण झाले.

पोर्तुगीज पाद्रींनी (विशेषत: जेजुईत व फ्रांसीस्कन. दोमिनिकन पाद्रींनी कोंकणी-मराठीत साहित्य निर्माण केल्याचा संदर्भ सापडतो. परंतु प्रत्यक्षात काही साहित्य आजतागायत हाती लागले नाही.) कोंकणीतून तीन प्रकारचे साहित्य त्यांनी निर्माण केले.

1) धर्मप्रचारकी साहित्य (दौत्रिनी, काथेकिज्म इ.)

2) व्याकरणे, शब्दकोश

3) साहित्यिक-मूल्य असलेले साहित्य (वनवाळ्यांचे मळो, सांतु आंतोनीची जिवित्वकथा इ.)

ह्या संपूर्ण कालखंडात कोंकणीच्या विविध बोलींमध्ये 19 व्याकरणे व 24 शब्दकोश पोर्तुगीज पाद्रींनी निर्माण केल्याचा उल्लेख सापडतो. परंतु 1684 ते 1855 ह्या भाषिक बंदीच्या काळात ह्यातील बरेचसे साहित्य काळाच्या पडद्याआड गेले. हस्तलिखिते नष्ट झाली, छापील साहित्य (निकृष्ट कागदामुळे अथवा दुर्लक्ष, हेळसांड, जप्ती इ. मुळे) नष्ट झाले. म्हणून 1858 साली कोंकणीचे एकही व्याकरण धड उपलब्ध नसल्याचा उल्लेख कुन्हा रिवार यांनी केला आहे. 1575 ते 1684 पर्यंतच्या ख्रिस्ती धर्मप्रचारकांनी केलेल्या साहित्याचा अभ्यास व संशोधन हे आज भाषेच्या संशोधकांना फार मोठे आव्हान आहे. त्यातील काही दिशा डॉ. कुळकर्णी यांनी आठव्या प्रकरणांत दाखवून दिल्या आहेत.

'बोली -अभ्यास' हा डॉ. कुळकर्णी यांच्या आवडीचा व अनुभवाचा विषय असल्यामुळे, कोंकणी बोलीच्या अभ्यासकांना ह्या पुस्तकाचा फारच उपयोग होईल. कोंकणीचे उत्तर कोंकणी, मध्य-कोंकणी व दक्षिण-कोंकणी हे भेद अजूनही बऱ्याच प्रमाणात शिल्लक आहेत. '-ऊंक', '-पाक' व '-च्याक' ह्या तीन प्रत्ययांवरून अजूनही कोंकणी भाषिक व्यक्ति कुठल्या प्रदेशातील आहे हे ओळखता येते. (उदा. करूंक, करपाक, करच्याक). ह्याचप्रमाणे स्थलांतरणे झाल्याने निर्माण झालेल्या कोंकणीच्या बोलींचा भाषाशास्त्रीय अभ्यास होणे जरूरीचे आहे.

ह्या साहित्यिक-लेखन झालेल्या बोलींव्यतिरिक्त अन्य प्रादेशिक किंवा जात/ व्यवसाया-नुसार काही बोलींचा अभ्यास डॉ. घाटगे यांनी व त्यांच्या सहकाऱ्यांनी (ज्यामध्ये खुद्द डॉ. सु.बा.कुळकर्णी यांचाही समावेश होता) केला आहे व तो पुस्तकरूपाने उपलब्ध आहे.

कोंकणीची प्रमाण बोली म्हणून सारस्वत बोली मानली जावी हे डॉ. कुळकर्णी यांचे मत मात्र वादग्रस्त आहे. प्रमाणीकरणाच्या संदर्भात सर्व समाज घटकांच्या व प्रादेशिक घटकांच्या अभिसरणातून सर्वमान्य बोली ''प्रमाण बोली'' म्हणून निश्चित पुढे येईल ह्याची खात्री आहे. ह्या ''प्रमाण-बोलीवर'' कुठल्याही समाजाचे, जातीचे अथवा प्रदेशाचे अधिपत्य, एकाधिकारशाही, वर्चस्व असणार नसून समरसतेचा (Assimilation) भाव असणार हे निश्चित. अभिसरणाची ही प्रक्रिया सुरू झाली असून गावडा, भंडारी, सारस्वत इ. सर्व जातींच्या कोंकणी भाषिक समाजाने काही समान शब्द समुच्चयांचा समान वापर सुरूही केला आहे. भौगोलिक




**(स्थलांतरणामुळे निर्माण झालेल्या कोंकणी बोली)**

रचनेमुळे, विपुल साहित्यिक रचनेमुळे तसेच बा.भ. बोरकरांदी प्रसिद्ध लेखक-कवींनी लेखन केल्यामुळे कोंकणीची अंत्रुजी-बोली ही झपाट्याने प्रमाण-बोली म्हणून पुढे येत आहे. शिक्षण, पत्रकारिता व दैनंदिन व्यवहार यामध्ये तिचा वापर फार मोठ्या प्रमाणावर होत आहे ही वस्तुस्थिती आहे.

पत्रकारिता म्हणजे कोणत्याही भाषेचे जिवंतपणाचे प्रमुख लक्षण होय. कोंकणीच्या संदर्भात पत्रकारतेला फार महत्त्व आहे. १८८९ साली सुरू झालेली कोंकणी पत्रकारिता आज वेगवेगळ्या स्वरूपांत व प्रकारांत अखंडपणे चालू आहे. 'सुनापरान्त' हे गोव्यातून प्रकाशित होणारे दैनिक, किंवा 'जाग' कोंकण टाइम्स, बिम्ब इ. नियतकालिके आणि 'राखणो' सारखी वृत्तपत्रे त्याची उदाहरणे आहेत.

अकराव्या व बाराव्या प्रकरणात डॉ. कुळकर्णी यांनी कोंकणी ललित व ललितेतर साहित्याचा आढावा घेतला आहे. ह्या पुस्तकाचा लेखनकाल 1987 चा दरम्यानचा असल्यामुळे व साधनांच्या तसेच संदर्भांच्या अनुपलब्धतेमुळे अनेक साहित्यिक, कवी यांचा ह्या पुस्तकात उल्लेख झाला नाही. नाटकाच्या संदर्भात लिहितांना, "परंतु अजूनही या रंगभूमीवर (कोंकणी रंगभूमीवर) महान प्रतिभेचा नाटककार जन्मास यावयाचा आहे."-असे विधान केले आहे. सर्व अनुल्लेखित साहित्यिकांची नावें व त्यांचे लेखन ह्याविषयी प्रस्तावनेतून लिहिणे अशक्य आहे. तरीही वरील विधानांसंदर्भात श्री. पुंडलीक नारायण नायक ह्या सुमारे 30 स्वतंत्र नाटके लिहून कोंकणी रंगभूमीला स्वतंत्र अस्तित्व निर्माण करून देणाऱ्या नाटककारांचे नांव आवर्जून घ्यावेच लागेल. वाचकांनी पुस्तकनिर्मितीचा काळ व डॉ. कुळकर्णी यांची साधन कमतरता लक्षात ठेऊन ह्या पुस्तकाचे वाचन करावे.

आज कोंकणीसारख्या लहान भाषांसमोरील सर्वात मोठा प्रश्न लिपीभेद आहे. ऐतिहासिक कारणांमुळे जरी पांच लिपींतून (देवनागरी, रोमन, कन्नड, मल्ल्याळम् व फारशी) कोंकणी लिहिली जात असली तरी भाषिक संघटन व समन्वयाच्या दृष्टीने आज त्या विभाजनाच्या भिंती बनल्या आहेत. प्रज्वलित भविष्याच्या दृष्टीने सर्वांनी देवनागरी लिपीचाच स्वीकार करणे क्रमप्राप्त आहे. त्या दृष्टीनेही डॉ. सु. बा. कुळकर्णी यांचे विधान फार मोलाचे आहे. ते म्हणतात, "गोमंतकाच्या निर्मितीपासून कोंकणीच्या झेंड्याखाली हिंदू, ख्रिश्चन व मुस्लिम कधी नव्हे इतक्या एकोप्याने एकत्र आले आहेत. 'बहूनामप्यसाराणां संहति कार्यसधिका'-हे तत्व ध्यानात घेऊन गोमंतकाच्या उत्कर्षासाठी झटणे हे त्यांच्या हिताचे आहे." गोमंतकियांमध्ये फूट पाडण्याचे कारस्थान खुद्द पोर्तुगीज 450 वर्षांत करू शकले नाहीत, ते कारस्थान व दुष्टकर्म घरभेदी करू शकणार नाहीत. परंतु यासाठी शासकीय व बिगर शासकीय पातळीवरून संपूर्ण कोंकणी समाजाच्या सर्व घटकांपर्यंत सातत्याने संपर्क, संवाद व समन्वय साधण्याची आवश्यकता आहे.

आजपर्यंत कोंकणी भाषेचा वापर तथाकथित मराठीवाद्यांनी स्वार्थासाठी केला. कोंकणीतील नादमाधुर्य, बोलीविविधता, सूक्ष्म अर्थछटा इ. वैशिष्ट्यांचा उल्लेख "प्रादेशिक", "गोमंतकीय" इ. प्रकारे करून कोंकणीचा गौरव केला गेला. परंतु दुसऱ्याबाजूने, मराठीची

बोली, गोमंतकी बोली, पेजखाऊ लोकांची भाषा, ख्रिस्ती लोकांची भाषा (गोवानीज), राष्ट्रीय वाङ्मय नसलेली भाषा, लिपी नसलेली भाषा, असे म्हणून कोंकणीची हेटाळणीही केली.

डॉ. कुळकर्णी म्हणतात, 'त्याच मराठी माणसांना कोंकणीचे लोढणे गळ्यात घालून मिरवयला फार आवडते ही एक मोठ्या मौजेचीच गोष्ट.' डॉ. कुळकर्णी यांनी कोंकणी भाषेची समर्पक व्याख्या केली आहे. ''सानुनासिक शब्दांची नादमय जुगलबंदी म्हणजे कोंकणी भाषा.'' कोंकणी भाषिक समाजाने आता लिपीभेद, प्रदेशभिन्नता, बोलीविविधता इ. छोट्या व क्षुल्लक भेदांवर मात करून नादमय, मधुर अशा ह्या पंचवीस बोलींच्या जननीच्या-कोंकणी भाषेच्या विकासासाठी झटले पाहिजे, असा संदेशच जणू सुदूर नागपूरहून डॉ. कुळकर्णी यांनी दिला आहे.

त्यासाठी शेवटच्या प्रकरणात कोंकणीच्या विकासासाठी, तिचा सर्वस्तरीय शिक्षणात अंतर्भाव करणे, त्यासाठी सर्व विद्याशाखांतील पाठ्यपुस्तके, संदर्भपुस्तके व ज्ञानग्रंथ तयार करणे, अनुवाद-ब्युरो स्थापन करणे, परिभाषा, कोष, व्याकरणे, वैचारिक साहित्य, पदनामकोष, शासनव्यवहारकोष, कायद्यांचे अनुवाद, मानक कोष इ. ची निर्मिती, सरकारी निधी व खाजगी संस्थांच्या पुढाकाराने करण्याची गरज प्रतिपादित केली आहे.

1961 साली गोव्याला स्वातंत्र्य मिळाले. त्यानंतर 1967 साली झालेल्या जनमत कौलाद्वारे गोवा स्वतंत्र प्रदेश म्हणून अस्तित्वात आला. 26 फेब्रुवारी 1975 रोजी केंद्रिय साहित्य अकादेमीने कोंकणीला स्वतंत्र भाषा म्हणून मान्यता दिली. 4 फेब्रुवारी, 1987 रोजी कोंकणी गोव्याची ''राजभाषा'' झाली. तदनंतर 30 मे, 1987 रोजी गोव्याला घटक राज्याचा दर्जा मिळाला व शेवटी 20 ऑगस्ट 1992 रोजी कोंकणीचा भारतीय संविधानाच्या आठव्या अनुसूचीत समावेश झाला. हे सर्व कायदेशीर सोपस्कार झाल्यानंतरही कोणत्याही स्वरूपात कोंकणीचा उल्लेख ''बोली'' म्हणून करणे म्हणजे डॉ. कुळकर्णी यांच्या भाषेत ''केवळ अशास्त्रीय नव्हे अशिष्टही ठरेल.'' त्यामुळे मराठी व इतर भाषिकांनी कोंकणी भाषा व समाजाकडे भ्रातृत्वाच्या / मित्रत्वाच्या नात्याने पाहिले पाहिजे. कोंकणी समाजाने हे लक्षात ठेवले पाहिजे की राजभाषा झाल्यामुळे गोव्यातील भाषिक वाद संपुष्टात आल्यासारखे वाटले, तरी विघ्नसंतोषी, दुराग्रही, घरभेदी घटक, हाच वाद लिपी, प्रदेश यांसारख्या अन्य आघाड्यांवर खेळल्याशिवाय राहणार नाहीत. त्यामुळे कोणत्याही परिस्थितीत संयम न सोडता, कोंकणी समाजाने विधायक संघर्ष करण्याची गरज आहे.

अशा विधायक व सकारात्मक संघर्षासाठी सज्ज होण्यासाठी भाषेच्या अनेक आघाड्यांवर सुसज्ज व्हावे लागणार आहे. अशा काही आघाड्या, निकष, कसोट्या व गमके डॉ. कुळकर्णी

यांनी सांगितली आहेत. कोंकणी भाषेला स्वतंत्र व परिपूर्ण भाषेचा दर्जा प्राप्त करून देण्यासाठी राजभाषा, धर्मभाषा, व्यवहारभाषा, आंतरराष्ट्रीय भाषा, ग्रंथभाषा, बहुजनभाषा, लेखनिविष्ट भाषा, आद्यभाषा, उच्चवाङमय सृजनशक्ती, अन्यभाषासृजनशक्ती, संस्कृतीप्रधान भाषा इ. सर्व आघाड्यांवर लढावे लागेल. ह्यासाठी ''कोंकणी भाषा : प्रकृती व परंपरा'' ह्या पुस्तकाचे बहुमोल मार्गदर्शन मिळणार आहे.

कोंकणीचा इतिहास हा संघर्षाचा इतिहास आहे. पारतंत्र्यात कोंकणीवर परकियांनी बंदी आणली व स्वातंत्र्यात स्वकीयांनी तिची निंदा केली. भारतातील अन्य कुठल्याच लहानमोठ्या भाषेला अस्तित्वासाठी व अस्मितेसाठी एवढा संघर्ष करावा लागला नसेल. ह्या भाषिक समाजाने पारतंत्र्यात इन्क्विजिशनचे अमानवी अत्याचार सोसले व स्वातंत्र्यात आपल्याच भाषेची अवहेलना सोसली.

माधव मंजुनाथ शानभाग यांनी ह्या संघर्षाची अधिकृत सुरूवात 1940 साली कारवारात ''कोंकणी भाषा मंडळ'' स्थापन करून केली. नंतर संघर्षाची ही ठिणगी जिथेतिथे पडून तिची ज्योत झाली. 1985 साली ''कोंकणी प्रजेचो आवाज'' ह्या चळवळी-संस्थेने ह्या ज्योतीचा वणवा केला. अनेक कोंकणी लेखकांनी लेखण्या सांडल्या व लाठ्या झेलल्या. राजकीय, सामाजिक इ. सर्व बाजूंनी परिस्थिती प्रतिकूल असतांनाही कोंकणीने यशाची सर्व शिखरे काबीज केली ती अस्मितेच्या जागरणामुळे व एकत्वाच्या दर्शनामुळे !

कोंकणीचा संघर्ष वैचारिक व वैधानिक दोन्ही आघाड्यांवर चालला. प्रारंभी शणै गोंयबाबांनी व पुनरूत्थानाच्या काळात मों. सेबेस्तियांव रोदोल्फ दाल्गाद, जर्सन द कुन्हा, प्रो. मारियान सालढाणा, ज्योकीं आंतोनी फर्नांडीस....इ. नी स्वातंत्र्यपूर्व काळात व डॉ. सुमित्र मंगेश कत्रे, डॉ. आनंद नाडकर्णी, रवींद्र केळेकर, डॉ. मनोहरराय सरदेसाय आणि ह्या पुस्तकाच्या माध्यमातून डॉ. सु. बा. कुळकर्णी यांनी वैचारिक पातळीवर हा लढा लढला आहे.

अशा प्रकारच्या लढ्यांतून व संघर्षातून कोंकणी भाषा आज सन्मानाने उभी आहे. प्रतिभेचे, नवोत्मेषाचे अनेक अंकूर तिला फुटत आहेत. समृद्ध भाषा म्हणविण्याच्या सर्व कसोट्या पूर्ण करण्याच्या निर्धारमार्गावर आहे. अशावेळी तिचे स्वरूप-विश्लेषण करण्याचा व तिच्या मार्गक्रमणेतील आव्हाने दाखवून देण्याचा प्रयत्न करणारे डॉ. सु. बा. कुळकर्णी यांचे हे पुस्तक निश्चित दीपस्तंभाप्रमाणे ठरेल यात तिळमात्र शंका नाही. कोंकणी ह्या भगिनी-भाषेसंबंधीचे गैरसमज व पूर्वग्रह दूर होऊन, तिच्या व्युत्पत्तीपासून ते विकासापर्यंतची वास्तव माहिती अंतर्भूत असल्यामुळे मराठी वाचकवर्ग ह्या पुस्तकाचे स्वागत करतील याची खात्री आहे.

# अनुक्रमणिका

यांनी सांगितली आहेत. कोंकणी भाषेला स्वतंत्र व परिपूर्ण भाषेचा दर्जा प्राप्त करून देण्यासाठी राजभाषा, धर्मभाषा, व्यवहारभाषा, आंतरराष्ट्रीय भाषा, ग्रंथभाषा, बहुजनभाषा, लेखनिविष्ट भाषा, आद्यभाषा, उच्चवाङमय सृजनशक्ती, अन्यभाषासृजनशक्ती, संस्कृतीप्रधान भाषा इ. सर्व आघाड्यांवर लढावे लागेल. ह्यासाठी ''कोंकणी भाषा : प्रकृती व परंपरा'' ह्या पुस्तकाचे बहुमोल मार्गदर्शन मिळणार आहे.

कोंकणीचा इतिहास हा संघर्षाचा इतिहास आहे. पारतंत्र्यात कोंकणीवर परकियांनी बंदी आणली व स्वातंत्र्यात स्वकीयांनी तिची निंदा केली. भारतातील अन्य कुठल्याच लहानमोठ्या भाषेला अस्तित्वासाठी व अस्मितेसाठी एवढा संघर्ष करावा लागला नसेल. ह्या भाषिक समाजाने पारतंत्र्यात इन्क्विजिशनचे अमानवी अत्याचार सोसले व स्वातंत्र्यात आपल्याच भाषेची अवहेलना सोसली.

माधव मंजुनाथ शानभाग यांनी ह्या संघर्षाची अधिकृत सुरूवात 1940 साली कारवारात ''कोंकणी भाषा मंडळ'' स्थापन करून केली. नंतर संघर्षाची ही ठिणगी जिथेतिथे पडून तिची ज्योत झाली. 1985 साली ''कोंकणी प्रजेचो आवाज'' ह्या चळवळी-संस्थेने ह्या ज्योतीचा वणवा केला. अनेक कोंकणी लेखकांनी लेखण्या सांडल्या व लाठ्या झेलल्या. राजकीय, सामाजिक इ. सर्व बाजूंनी परिस्थिती प्रतिकूल असतांनाही कोंकणीने यशाची सर्व शिखरे काबीज केली ती अस्मितेच्या जागरणामुळे व एकत्वाच्या दर्शनामुळे !

कोंकणीचा संघर्ष वैचारिक व वैधानिक दोन्ही आघाड्यांवर चालला. प्रारंभी शणै गोंयबाबांनी व पुनरूत्थानाच्या काळात मों. सेबेस्तियांव रोदोल्फ दाल्गाद, जर्सन द कुन्हा, प्रो. मारियान सालढाणा, ज्योकीं आंतोनी फर्नांडीस....इ. नी स्वातंत्र्यपूर्व काळात व डॉ. सुमित्र मंगेश कत्रे, डॉ. आनंद नाडकर्णी, रवींद्र केळेकर, डॉ. मनोहरराय सरदेसाय आणि ह्या पुस्तकाच्या माध्यमातून डॉ. सु. बा. कुळकर्णी यांनी वैचारिक पातळीवर हा लढा लढला आहे.

अशा प्रकारच्या लढ्यांतून व संघर्षातून कोंकणी भाषा आज सन्मानाने उभी आहे. प्रतिभेचे, नवोन्मेषाचे अनेक अंकूर तिला फुटत आहेत. समृद्ध भाषा म्हणविण्याच्या सर्व कसोट्या पूर्ण करण्याच्या निर्धारमार्गावर आहे. अशावेळी तिचे स्वरूप-विश्लेषण करण्याचा व तिच्या मार्गक्रमणेतील आव्हाने दाखवून देण्याचा प्रयत्न करणारे डॉ. सु. बा. कुळकर्णी यांचे हे पुस्तक निश्चित दीपस्तंभाप्रमाणे ठरेल यात तिळमात्र शंका नाही. कोंकणी ह्या भगिनी-भाषेसंबंधीचे गैरसमज व पूर्वग्रह दूर होऊन, तिच्या व्युत्पत्तीपासून ते विकासापर्यंतची वास्तव माहिती अंतर्भूत असल्यामुळे मराठी वाचकवर्ग ह्या पुस्तकाचे स्वागत करतील याची खात्री आहे.

# अनुक्रमणिका

# प्रास्ताविक

गेली काही वर्षे कोंकणी भाषेचा प्रश्न अनेक पंडितांच्या आणि त्यांच्या मतलबी पाठिराख्यांच्या डोक्यात एकसारखा ठुसठुसत होता. यांतील एक गट कोंकणी ही स्वतंत्र भाषा आहे असे मानणारा आहे. दुसऱ्या गटाला हे बिलकुल मान्य नाही. त्यांच्या मते कोंकणी ही मराठी भाषेचीच एक बोली आहे. ह्या प्रश्नावर वृत्तपत्रांतून अनेक वाद आणि वादंग माजविले गेले. सभा संमेलनातून लोक हमरीतुमरीवर आले. कोणी हातघाईवरही आले. काहीजणांनी तर हा वाद सरळ रस्त्यावरच आणला. आजकाल कोणताही वाद रस्त्यावर आणला म्हणजे चुटकीसरशी सुटू शकतो. असा समज दृढ झाला आहे. मागे गुजराथीचे जोखड भिरकावून देण्यासाठी मराठी मंडळी अशीच रस्त्यावर आली होती. त्यांच्या या कृतीला 'संयुक्त महाराष्ट्राचा लढा' असे भारदस्त नाव आहे. त्याच मराठी माणसांना कोंकणीचे लोढणे गळ्यात घालून मिरवायला फार आवडते, ही एक मोठ्या मौजेचीच गोष्ट होय.

दहा पंधरा वर्षांपूर्वी (1970 च्या दशकात) कोंकणीला 'साहित्यिक भाषा' म्हणून मान्यता देण्याचा प्रस्ताव साहित्य अकादमीसमोर आला होता. त्यावेळी अनेक मराठी पंडितांना भडभडून आले. कोंकणी ही स्वतंत्र भाषा नसून मराठीचीच एक बोली आहे, हे त्यांचे आवडते प्रमेय होय. ते सिद्ध करण्यासाठी त्यांनी आतापर्यंत शेकडो टन कागद-शाई खर्च केली आहे. कोंकणीचे प्राचीनत्व त्यांना बिलकूल मान्य नाही. कोंकणीतील साहित्य त्यांना भुस्कटासमान वाटते. तशी निवेदने त्यांनी अकादमीसमोर सादर केली. राजधानीत जाऊन अंगारे-धुपारेही केले. पण गुण काही आला नाही. कोंकणीला साहित्यिक भाषा म्हणून मान्यता मिळाली ती मिळालीच !

एके काळी, कोंकणी ही मराठीची बोली आहे हे सिद्ध करण्यासाठी मराठी संत साहित्यातून कोंकणी शब्दांचा शोध घेण्याची व ग्रियर्सनने दिलेल्या कोंकणी उताऱ्यांची छाननी करण्याची एक मोहिमच या पंडितांनी उघडली होती. एका गोंयकार पंडिताने तर या कामासाठी आयुष्यभर आपली लेखणी झिजवली. त्याच्या शिष्यगणांनी गुरूची परंपरा मोठ्या नेटाने पुढे चालवली. पुण्याच्या साहित्य परिषदेतील पंडित मंडळींनी तर या कामासाठी एक समितीच नामित केली होती. या मंडळींनी पुण्यातल्या पुण्यात बसून बारकाईने शोध घेतला, शास्त्रीय खलबते केली, व ''कोंकणी ही स्वतंत्र भाषा नव्हें'' असा पांडित्यपरिप्लुत निवाडा दिला. हा निवाडा 'कोंकणी-

अहिराणी समितीचा वृत्तांत' या नावाने मशहूर आहे.

या वृत्तांतात पंडित मंडळींनी एखादी भाषा ही स्वतंत्र भाषा केव्हा समजावी याची काही गमके सांगितली आहेत. त्यांच्या मते, राजभाषा, धर्मभाषा, व्यवहारभाषा, आंतरराष्ट्रीय भाषा, ग्रंथ भाषा, बहुजन भाषा, लेखनिविष्ट भाषा, आद्य भाषा, उच्च वाङमय सृजनशक्ती, अन्य भाषा सृजनशक्ती, संस्कृतीप्रधान भाषा इ.पैकी एक जरी गुण एखाद्या भाषेत असला तरी त्या भाषेला स्वतंत्र भाषा म्हणून समजण्यास हरकत नाही.

पंडितांच्या निकषांप्रमाणे कोंकणी भाषेचा विचार करणे मनोरंजक ठरेल. कोंकणी ही आज 'राजभाषा' आहे. 4 फेब्रुवारी, 1987 रोजी गोमंतकाच्या राजसिंहासनावर तिची प्रतिष्ठापना झाली. कोंकणी ही गोमंतक, कर्नाटक, केरळ व महाराष्ट्रातील लक्षावधी ख्रिस्ती - धर्मियांची 'धर्मभाषा' आहे. गेल्या साडेतीनशे वर्षांत शेकडो ख्रिस्ती धर्मग्रंथांची निर्मिती कोंकणी मध्येच झाली आहे. त्यात बायबलची भाषांतरे आणि रुपांतरे आहेत, पुराणे आहेत आणि प्रार्थना गीतेही आहेत. त्यांचा सर्व धर्म व्यवहार कोंकणीमध्येच चालतो. 14 लक्ष लोकांची कोंकणी ही मातृभाषा आहे. याच भाषेत त्यांचा दैनंदिन व्यवहार चालू असतो. ह्यादृष्टीने कोंकणी ही 'व्यवहार भाषाही' आहे. कोंकणीही 'लेखनिविष्ट भाषा' देखील आहे. ज्याला आम्ही मराठीचा आद्य शिलालेख म्हणून संबोधतो तो श्रवणबेळगोळ येथील गोमटेश्वराचा कोरीव लेख वास्तवात कोंकणी भाषेत कोरलेला आहे. गेली एक हजार वर्षे कोंकणीचे लेखन नागरी लिपीत होत आहे. एवढेच काय, प्रदेशभिन्नतेनुसार कन्नड, तुळु, मल्याळम् आणि रोमन या लिपींचा वापरही सहजतेने केला जातो. सहस्त्र वर्षांच्या कालखंडात परिवर्तित होत होत आज जवळपास 25 बोलींची कोंकणी ही जननी आहे. या सर्व बोलींची ती 'आद्य भाषा' होय. कोंकणीने उत्तमोत्तम साहित्याची निर्मिती करून आपली कूस उजवी आहे हे सिद्ध केले आहे. साहित्य अकादमीने देखील तिला 'साहित्यिक भाषा' म्हणून मान्यता दिली आहे. कोंकणीत रामायण-महाभारत- पुराणादि ग्रंथातील कथावस्तूवर आधारलेले राष्ट्रीय वाङमय नाही, अशी ग्रियर्सनची तक्रार होती. अशा कथांची प्राचीन कोंकणी बाडे केरळात आणि ब्रागमधील ग्रंथालयात आढळल्यापासून या तक्रारीलाही अर्थ राहिलेला नाही. अर्वाचीन काळातील रवींद्र केळेकारांचे कोंकणी महाभारत त्या भाषेच्या अंतर्जात वाक्शक्तीचा प्रत्यय घडविण्यास पुरेपूर सक्षम आहे. पुरातन काळापासून गोमंतकाच्या लोकजीवनाला स्वतंत्र असा घाट आहे. हीच ती कोंकणी संस्कृती. कोंकणी भाषा ही या संस्कृतीची वाहक आहे व प्रेरणाही आहे. लक्षावधी लोकांच्या अस्मितेचा ती विषय आहे.

आज कोंकणी ही सर्वार्थाने आणि सर्व कसोट्यांनी 'स्वतंत्र भाषा' म्हणून सिद्ध झ
आहे. दि.20 ऑगस्ट 1992 रोजी संसदेने 77 व्या दुरुस्ती विधेयकान्वये कोंकणीचा भार
संविधानाच्या आठव्या परिशिष्टात अंतर्भाव केल्यापासून तिला मराठीइतकीच वैधानिक प्र
प्राप्त झाली आहे. इत:पर कोंकणी ही मराठी भाषेची बोली आहे असे म्हणणे केवळ अशास्त्री
नव्हे, तर अशिष्टपणाचेही ठरेल.

सव्वाशे वर्षांपूर्वी (इ. स. 1857) कुंज रिव्हार या पोर्तुगीज पंडिताने सुरु केलेला कोंकण
मराठी वाद वस्तुत: केव्हाच संपलेला होता. महाराष्ट्रात सामील व्हायचे नाही असा स्पष्ट नि
देऊन गोमंतकाने त्यास दि. 16 जानेवारी 1967 रोजीच मूठमाती दिली होती. भाषाव
प्रांतरचनेच्या तत्वास आधारून दि. 30 मे 1987 पासून गोवा हे भारतीय संघराज्याचे पंचविस
घटक राज्य बनले. कोंकणी भाषेची राजसिंहासनावर प्रतिष्ठापना झाली आणि त्याबरोबर
गोंयकारांच्या दीर्घकालीन प्रतिक्षेचे पर्वही संपले. त्यांच्या मधुस्वप्नांचा गुलमोहर फुली आल
'मांय कोंकणी' बरोबर त्यांनी 'मराठी मावशी'चाही मान राखला. भाषिक वाद हे केवळ भाषि
वाद कधीच नसतात. ते लाक्षणिक असतात. त्यांच्या पाठीशी सामाजिक, वांशिक, सांस्कृतिक
भौगोलिक, ऐतिहासिक, राजकीय, आर्थिक इ. क्षेत्रांतील दीर्घकालीन असंतोष वा स्पर्
कारणीभूत असते. दोन लोकसमूहांतील संघर्षाचे ते दृश्यरूप असते एवढेच ! कोंकणी-मराठ
कलहाचे मूलबीज त्या लोकसमूहांच्या वसाहतकालीन स्पर्धेत शोधता येते. या स्पर्धेला ती
सहस्त्र वर्षांचा इतिहास आहे. हा वाद जसा मराठी समाजाशी आहे; तसाच तो कानडी, उडपी
केरळी समाजांशीही आहे. अन्याय आणि अवरोधाच्या विरोधातील ती एक स्वाभाविक प्रतिक्रिय
होय.

19 डिसेंबर 1961 रोजी पोर्तुगीजांच्या मगरमिठीतून गोव्याची सुटका झाली आणि
कोंकणीच्या विकासाला एक आगळीच गती प्राप्त झाली. भाषिक आधारावर गोवा हे भारतीय
संघराज्यातील एक स्वतंत्र राज्य बनले. गोव्याचे स्वतंत्र विद्यापीठ स्थापन झाले. साहित्यिक
भाषा, राजभाषा आणि राष्ट्रीय भाषा म्हणून कोंकणीला मान्यता मिळाली. एखाद्या लोकसमूहाची
अस्मिता जागृत झाल्यावर काय होऊ शकत नाही? नजीकच्या भविष्यकाळात गोवा, सिंधुदुर्ग,
कारवार, सुपे, शिर्सी, सिद्दापूर, येल्लापूर व बेळगाव - खानापूरकडील सलग कोंकणीभाषी
प्रदेशाचे 'विशाल गोमंतक' राज्य निर्माण झाल्यास त्याचेही नवल वाटावयास नको!



प्रकरण पहिले

# कोंकण आणि कोंकणी

कोंकणची भाषा ती कोंकणी, हे एक चुकीचे समीकरण होय. कोंकणाच्या चतु:सीमा माहित नसल्याने ही गफलत नेहमीच होते. भरीत भर म्हणजे येथील भाराभर बोलीभाषा होत. ग्रियर्सनने वीस एक कोंकणी बोलींचे नमुने सादर करून आणखीनच गोंधळ उडवून दिला आहे.

'कोंकण' हा एक अतिशय प्राचीन प्रदेश होय. 'महाराष्ट्र' अस्तित्वात येण्यापूर्वीही तो जगाला ज्ञात होता. बृहत्संहितेत सप्तकोंकणाचा निर्देश आढळतो. मार्कंडेय पुराण, ब्रह्मांड पुराण, पद्मपुराण, महाभारत या ग्रंथांतूनही त्याचे उल्लेख आढळतात. ह्यूएनत्संगने या प्रदेशातून प्रवास केला होता. द्रविड देशाच्या 400 मैल उत्तरेस कोंकण असल्याचे तो सांगतो. येथील हवा उष्ण, आणि लोक ओबडधोबड पण ज्ञानोपासक आहेत, असे त्याला आढळून आले. येथे 100 बौद्ध मठ आणि 1000 बौद्ध भिक्षू आहेत, असे तो वर्णन करतो.

ह्यूएनत्संगने वर्णिलेली कोंकणची राजधानी कोंकणपूर कोठे होती हे मात्र कळत नाही. प्राकृत साहित्यात आणि राष्ट्रकुटांच्या शिलालेखांत 'कोंकण' नावाच्या विषयाचा, म्हणजे प्रांताचा उल्लेख आढळतो. पश्चिमी गंगवंशाचा आद्यपुरुष, काण्वायन गोत्री नृप 'कोंगणिवर्मन' हा होता. या नृपनामावरून इ.सनाच्या चौथ्या शतकात कर्नाटकाच्या दक्षिण भागातील गंगाबाडीपर्यंत कोंकणी राजांचे साम्राज्य पसरलेले असावे असा कयास करता येतो. विविध कालखंडांत व राजवटींत कोंकणाच्या उत्तर-दक्षिण सीमा बदलल्या तरी पश्चिमेस अरबी समुद्र व पूर्वेस सह्य पर्वताची रांग ह्या सीमा स्थिर आहेत. सामान्यत: नासिक व सुरत जिल्ह्यांतून वाहणाऱ्या दमणगंगा (धामणगंगा) नदीपासून कारवार (उत्तर कानरा) जिल्ह्यातून वाहणाऱ्या गंगावली नदीपर्यंतचा किनारी प्रदेश कोंकण म्हणून ओळखला जाई.

रायगड (कुलाबा) जिल्ह्यातील कुंडलिका नदीमुळे कोंकणाचे उत्तर कोंकण व दक्षि कोंकण असे दोन भाग पडलेले आहेत. डॉ. रामकृष्ण भांडारकरांच्या मते उत्तर कोंकण ह 'अपरान्त' होय. दक्षिण कोंकणात 'बनवासी' व 'गोमंतक' यांचा समावेश असे. टॉलेमी गुजरात व उत्तर कोंकण यांस 'लारिका' व दक्षिण कोंकणास 'आरिका' असे म्हटले आहे शिलाहारांच्या काळात उत्तर कोंकण हा 'कोंकण 1400' व दक्षिण कोंकण हा 'कोंकण 900 अशा दोन स्वतंत्र राज्यांत विभागलेला होता. सामान्यपणे उत्तर कोंकणची राजधानी 'नालासापोरा (शूर्पारक) येथे व दक्षिण कोंकणची राजधानी 'दंडा-राजपुरी' (पुरी) येथे असे. महाभारताच्या सभापर्वात सहदेवाने पश्चिम किनाऱ्यावरील जे देश जिंकले त्यांत शूर्पारक, दंडक व करहाटक यांचा समावेश होता.

प्राचीन वाङमयात 'लंका' किंवा 'सिंहलद्वीप' हा देश कोठे असावा यासंबंधी निश्चित अनुमान करण्याइतका सुसंगत पुरावा उपलब्ध नाही. गोमंतकाचे प्राचीन नाव 'लंका किंवा सिंहल' असावे असे रट्टराजाच्या खारेपाटण ताम्रपटावरून (शके 930) दिसून येते. या ताम्रपटात दक्षिण कोंकणातील शिलाहार राजवंश हा मूळचा 'सिंहल' होय असे स्पष्ट म्हटले आहे. कदंब अधिपती जयकेशिन याने लंकेच्या राजाचा पराभव करून जिंकून घेतलेला प्रदेश 'गोवा' होय असे दगांवे शिलालेखावरून दिसून येते. कित्येक शिलाहार नृपती आपणास 'नि:शंक लंकेश्वर' असे बिरूद लावून गोमंतक आपल्या आधिपत्याखाली होता असे दर्शवितात. हा प्रदेश गोमंत, गोवा, गोवापुरी, गोपकपट्टण, गोपपुरी या नावांनीही परिचित होता. महाभारताच्या भीष्मपर्वात (अध्याय 9) आणि स्कंधपुराणात (सह्याद्रि खंड) गोव्याचा 'गोमंत' असा निर्देश आढळतो. सूतसंहितेत 'गोवापुरी' असे म्हटले आहे. कदंबांची राजधानी 'गोपकपट्टण' म्हणजे आजचे थोरले गोवे येथे होती. शके 1113 च्या कशेळी ताम्रपटात शिलाहार नृप भोज (द्वितीय) याने पळून गेलेल्या विजयादित्य नावाच्या 'गोव्याच्या' राजास पुन्हा गादीवर बसविले असा उल्लेख येतो. (गोवायां परिनष्टभूमिपतय: सुस्थापिता स्तेजसा). एवंच, गोवा हा प्रदेश लंका म्हणून ओळखिला जाई की काय याचा शोध घेण्यास भरपूर वाव आहे.

सांप्रत कोंकण म्हणून ओळखल्या जाणाऱ्या प्रदेशात मुंबईसह ठाणे, रायगड, रत्नागिरी व सिंधुदुर्ग अशा चार जिल्ह्यांचा अंतर्भाव होतो. ह्या प्रदेशाची भाषा कोंकणी नव्हे हे आवर्जून सांगावे लागते. येथील रहिवासी आपल्या परस्पर - व्यवहारासाठी प्रमाण मराठीचा वापर करतात. ग्रियर्सनने या मराठीचा 'कोंकण स्टँडर्ड' असा निर्देश केल्याने ती 'कोंकणी स्टँडर्ड' असावी

असा अनेकांचा गैरसमज होतो.

आजची प्रमाण मराठी ही मुळात कोंकणातील कायस्थ प्रभूंची भाषा होय, असे अ.का.प्रियोळकर यांचे रास्त मत होते. सतराव्या व अठराव्या शतकांतील मराठी बखरी व अन्य ऐतिहासिक गद्याचे लेखक प्रामुख्यानं कायस्थ प्रभूच होते. एकोणिसाव्या शतकात पाठशाळातील शिक्षक, पाठ्यपुस्तकांचे लेखक व सरकारी कार्यालयातील कारकून म्हणूनही यांचाच भरणा मोठ्या प्रमाणावर असे. एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात यांचीच बोली प्रमाण मराठी म्हणून विकसित झाली. महाराष्ट्राच्या वसाहत काळात अनेक सामाजिक गट बाहेरून येऊन कोंकणात स्थायिक झाल्याने या प्रदेशात ज्ञातिनिष्ठ बोलींचा सुळसुळाट आढळून येतो. येथील लोकांच्या आडनावांमधून विविध राजवटींचे अवशेष आढळून येतात. उदा. मोरे (मौर्य), सकपाळ (शक), चाळके (चालुक्य), शेलार (शिलाहार), जाधव (यादव), खरात (क्षहरात), भोसले (होयसळ), गुजर (गुर्जर), पोवार (परमार), चव्हाण (चाहुमान), राठोड (राष्ट्रकूट), माणके व वानखेडे (मान्यखेटक) इत्यादी. ग्रियर्सनने आपल्या भारतीय भाषांच्या सर्वेक्षणाच्या सातव्या खंडात कोंकणातील वीस मराठी बोलींचे नमुने सादर केले आहेत. या बोली परभी, मच्छिमार कोळी, महादेव कोळी, किरिस्तांव, कुणबी, आगरी, धनगरी, भंडारी, ठाकरी, कऱ्हाडी, संगमेश्वरी, बाणकोटी, घाटी, कातकरी, वारली, वाडवळ, फुटगी, सामवेदी, मांगेली व माहारी अशा होत. सिंधुदुर्ग जिल्ह्यातील चित्पावनी, मालवणी व कुडाळी या मात्र कोंकणी भाषेच्या बोली होत.

ठाणे, नासिक, धुळे व डांग या जिल्ह्यांतील 'कोंकणे' या आदिवासी समाजाची बोली 'कोंकणी' या नावाने ओळखली जात असली तरी तिचा गोमंतकातील कोंकणीशी नामासादृश्यापलीकडे संबंध नाही. ती एक भिल्लीवर्गीय बोली आहे.



प्रकरण दुसरे

# गोंय, गोंयकार आणि कोंकणी भास

तेरेखोलची खाडी ओलांडून दक्षिणेकडे सरकले म्हणजे गोमंतक चालू होतो. पेडणे, बारदेस, बिचोली (डिचोली), सत्तरी, तिसवाडी, मडगांव, फोंडें. साष्टी, सांगें, केपें, काणकोण हे तालुके ओलांडून माजाळी-मुडगिरीस पोहोचले म्हणजे गोमंतकाची दक्षिण सरहद्द लागते. गोमंतक म्हणजे सौंदर्य, शुचिता आणि संपन्नता यांचा महासंगम. पूर्वेस दूधसागराचे नाजुक नर्तन, तर पश्चिमेस महासागराचे विराट तांडव. वने, उद्याने, सरिता, सरोवरे, मंदिरे, गिरिजाघरे यांनी गजबजलेला हा भूप्रदेश गेली अडीच हजार वर्षे कोंकणी संस्कृतीचे केंद्र आहे. येथील लोकजीवनात प्राच्य आणि प्रतीच्च प्रवृत्तींचे मधुमीलन प्रतीत होते. हेच ते 'गोंय'. इथल्या मातीशी नाते सांगेल तो 'गोंयकार'. वसुंधरेच्या पाठीवरील सर्व गोंयकारांस स्नेहनिबद्ध करणारे सुवर्णसूत्र म्हणजे 'कोंकणी भास'. दोन गोंयकार कोठेही आणि कोणत्याही अवस्थेत भेटोत; सानुनासिक कोंकणी शब्दांची नादमय जुगलबंदी चालू झालीच म्हणून समजावे.

गोमंतक हे कोंकणी संस्कृतीचे हृदयस्थान होय. केवळ 3701 चौरस किलोमीटर क्षेत्रफळाचा हा भूखंड. तब्बल साडेचार शतकांच्या फिरंग्यांच्या गुलामगिरीतून 19 डिसेंबर 1961 रोजी मुक्त झाला. गेली सहस्त्र वर्षे येथील प्रजा कोंकणी भाषा बोलत आहे. या कोंकणीला नष्ट करण्याचे फिरंग्यांनी नाना प्रयत्न केले. कोंकणी बोलण्यावर बंदी घातली. कोंकणी लिहिण्यावर बंदी घातली. कोंकणीतील सर्व ग्रंथरचना जाळून टाकली. कोंकणी बोलणाऱ्यांचा अनन्वित छळ केला. त्यांच्या घरादारावर गाढवाचा नांगर फिरवला. त्यांना बंदिवासात टाकले. त्यांच्यावर इन्क्विझिशनचे खटले भरले. कित्येकांना जिवंत जाळले. पण कोंकणी जळाली नाही. फिनिक्स पक्षाप्रमाणे पुनर्जन्म घेत राहिली. नवनवोन्मेषशालिनी बनत राहिली. शेवटी फिरंग्यानाच हात टेकावे लागले. धर्मप्रसारासाठी कोंकणीचीच कास धरावी लागली. कोंकणी भाषेत दौत्रिनी,

शास्त्रे, पुराणे, संतचरित्रे लिहावी लागली. कोंकणीची व्याकरणे रचावी लागली. कोंकणीचे शब्दकोष बनवावे लागले. कोंकणी शिक्षणाच्या पाठशाळा उघडाव्या लागल्या.

पंचवीस वर्षांपूर्वी गोमंतकातील खेड्यापाड्यात कोंकणीचेच अधिराज्य होते. त्यावेळी इंग्रजीच काय, पण मराठी जाणणारा माणूसही शोधून काढावा लागे. 1961 च्या जनगणनेच्यावेळी भारतातील एकूण 13 लक्ष 71 हजार कोंकणी भाषकांपैकी 5 लक्ष 65 हजार कोंकणी भाषक केवळ गोमंतकातच राहात होते. त्यावेळी महाराष्ट्रात 2 लक्ष 10 हजार, कर्नाटकात 4 लक्ष 92 हजार, तर केरळात 77 हजार कोंकणी भाषक होते. 1981 च्या जनगणनेप्रमाणे भारतातील कोंकणी भाषकांची एकूण संख्या 15 लक्ष 65 हजार एवढी झाली आहे.*

गोमंतक हे शैक्षणिकदृष्ट्या पुढारलेले राज्य आहे. 1981 च्या जनगणनेप्रमाणे येथील साक्षरतेचे प्रमाण 57 टक्के आहे.** राजभाषा मराठीचे आद्यपीठ असलेल्या महाराष्ट्रात ते 47 टक्के आहे; तर कर्नाटकात केवळ 38 टक्के आहे ! आज गोमंतकात गावोगावी कोंकणी, मराठी व इंग्रजी माध्यमाच्या शाळा निघाल्या आहेत. गोवा विद्यापीठाची स्थापना झाल्यापासून येथील उच्चशिक्षणास नवा आयाम प्राप्त झाला आहे. गोमंतकाबाहेरील गोंयकारांचे कोंकणी भाषेवर अफाट प्रेम आहे. या बाबतीत मुंबईतील गोंयकार अग्रेसर होत. 1961 च्या जनगणनेच्यावेळी बृहन्मुंबईत 1, 92, 773 एवढे कोंकणी भाषक होते. घराबाहेर मराठी वा इंग्रजीचा वापर करणारी ही मुंबैकार मंडळी घरामध्ये मात्र कोंकणीच्या फुफ्फुसानेच श्वास घेतात. गोवा पारतंत्र्यात होता तेव्हा देखील मुंबईच्या आकाशवाणीवर कोंकणी कार्यक्रम चाले. 31 ऑगस्ट 1978 रोजी दूरदर्शनवर पहिला कोंकणी कार्यक्रम झळकला.

गोव्याच्या स्वातंत्र्य चळवळीची सूत्रे मुंबईतून हालत. कोंकणीची अस्मिता मुंबईकरांनीच जागवली. मुंबईच्या भूमीवर कोंकणी साहित्याचे अमाप पीक निघाले. गिरगावातील गोमंतक छापखान्याने ते घरोघर पोहोचविले. सर गोविंद नारायण माडगावकर, डॉ. भाऊ दाजी लाड, डॉ. जर्सन द. कुन्हा, न्यायमूर्ती तेलंग, सर नारायण चंदावरकर, डॉ. रामकृष्ण भांडारकर, श्री. जोकिम आल्वा, श्री. अनंत चंद्रोबा डुकले, श्री. सेबॉस्टिओ कार्व्हालो, आचार्य धर्मानंद

** 1991 च्या जनगणना संख्यावारीप्रमाणे एकूण कोंकणी भाषकांची संख्या 17 लक्ष 60 हजार एवढी आहे.*

*** 2001 च्या जनगणनेप्रमाणे येथील साक्षरतेचे प्रमाण ८२ % आहे.*

कोसंबी, डॉ. सुखटणकर, डॉ. बालिगा, डॉ. शिरोडकर, गानकोकिळा लता मंगेशकर, सूरश्री केसरबाई केरकर, श्री. माधव अनंत पै, श्री. काका कालेलकर*, डॉ. अ. का. प्रियोळकर इ. शेकडो नामवंत गोंयकारांनी मुंबईचीच काय, पण भारत देशाची मान उंचावली आहे. कर्नाटकातील कारवार (उत्तर कानरा) व मंगळूर (दक्षिण कानरा) या जिल्ह्यांतील ख्रिश्चन, गौड सारस्वत व चित्रापूर सारस्वत ही सर्व मंडळी कोंकणीभाषी आहेत. यांच्यामधील मल्लया, कामथ, नाईक, शेणॉय, किणी, बालिगा, प्रभू, पै, हेगडे, भट, पडियार, कुडुवा इ. कुटुंबांतील मंडळी बुद्ध्याश्रयी व्यवसायांत सर्वत्र आघाडीवर आहेत. कोंकणी व कन्नड या दोन्ही भाषांत त्यांना रुची व गती आहे. 1961 च्या जगगणनेमध्ये 2 लक्ष 50 हजार कोंकणी भाषकांनी कन्नड ही आपली दुय्यम भाषा असल्याची नोंद केली होती. मराठी जाणणारे मात्र 46 हजारच होते !

कोंकणीचे हातपाय केरळात देखील फार दूरवर पसरलेले आहेत. अलेप्पी, एर्नाकुलम आणि कन्नानूर या जिल्ह्यांत गावोगाव कोंकणी लोक आहेत. त्रिवेंद्रमपासून दहा मैलांवर ओरुवाटिल कोट्टा नावाच्या गावात 400 कोंकणी आहेत. एर्नाकुलमपासून तीस मैलांवर असलेल्या वरापुळ गावी कोंकण्यांची 300 कुटुंबे आहेत. वैपीन बेटावरही यांची मोठी वस्ती आहे. केरळातील कोंकणी स्वत:ला कुडुंबी म्हणवितात. मल्ल्याळी मंडळी त्यांस मूप्पम्मार किंवा बायचेट्टि म्हणून ओळखतात. यांची बडकी नावाची एक उपज्ञाती आहे. कुडुंबी लोक व्यवसायाने शेतकरी असून ते पोहे बनविण्याचा उद्योगही करतात. कोचीनमध्ये सुमारे 25 हजार सारस्वत आहेत. एर्नाकुलममध्येही जवळपास 10 हजार सारस्वत आहेत. मल्ल्याळी लोक यांना कोंगणिमार म्हणून ओळखतात. यातील गौड-सारस्वत वैष्णव असून मध्वाचार्यांचे अनुयायी आहेत. यांच्यात अप्पॉळुकारी ऊर्फ भट्टर म्हणून एक पोटजात असून तिचे लोक काशीमठाचे अनुयायी आहेत. चित्रापूर-सारस्वत हे शैव असून कैवल्यमठाचे अनुयायी आहेत.

कासरगोड तालुक्यात आरे-मराटे नावाचे आदिवासी असून त्यांच्या भाषेस काडे कोंकणी असे म्हणतात. हे मासे विकण्याचा व्यवसाय करतात. कासरगोडमध्ये कोंकणीची कऱ्हाडी बोली बोलणारे लोकही मोठ्या प्रमाणावर आहेत. उत्तर कानरा जिल्ह्यातील भटकळ या गावी असलेले नवाईत मुस्लीमही कोंकणीभाषी आहेत. टिपू सुलतानाच्या कारकीर्दीत हे मुस्लीम बनले. बेळगांव, खानापूर भागांतही कोंकणीची बारदेशी बोली बोलणाऱ्या मंडळींची संख्या फार मोठी आहे.



* *(टीप : काकासाहेब कालेलकर यांचे नांव गोमंतकीय म्हणून अनावधानाने आले आहे. ते मूळचे सातारचे)*

प्रकरण तिसरे

# कोंकणीची पूर्वपीठिका

या वसुंधरेच्या पाठीवर सुमारे सात हजार भाषा बोलल्या जातात. कोंकणी ही त्यांपैकी एक होय. ही इंडोयुरोपियन भाषाकुलाची भाषा. मराठी, गुजराती, हिंदी, बंगाली इ. भारतीय भाषांची ही भगिनी होय. ग्रीक, लॅटिन, संस्कृत यांसारख्या प्राचीन भाषा काय, किंवा इंग्रजी, जर्मन, फ्रेंच, पोर्तुगीज, रशियन यांसारख्या अर्वाचीन भाषा काय, या सर्व तिच्या आप्तवर्गातच मोडतात.

सुमारे पाच हजार वर्षांपूर्वी दक्षिण रशियातील काळ्या समुद्राच्या उत्तरेस असलेल्या व्होल्गा आणि नीपर या नद्यांमधील गवताळ प्रदेशात गोपाळांची एक संस्कृती नांदत होती. युरोप आणि आशिया खंडांतील अनेक अर्वाचीन संस्कृतींचा हा मूलस्रोत होय. पुरातत्त्वज्ञ हिला 'कुर्गन संस्कृती' म्हणून ओळखतात. रशियन भाषेत 'कुर्गन' या शब्दाचा अर्थ 'मृतांच्या टेकड्या' असा होतो. या प्रदेशातील मृतांच्या टेकड्यांमध्ये या संस्कृतीचा आढळ झाल्याने तिला 'कुर्गन' हे नाव पडले. मानवशास्त्रज्ञांच्या मते या संस्कृतीचे लोक आदिआर्य होत. भाषावैज्ञानिक मंडळी या लोकांचा 'वीरोस' या प्राग्-इंडोयूरोपियन भाषेतील शब्दाने निर्देश करतात व त्यांच्या भाषाकुलास 'इंडोयूरोपियन' असे संबोधितात.

कुडांच्या घरात राहणारा, शेतीची थोडीबहुत माहिती असलेला आणि दगडा-लोखंडाची हत्यारे वापरणारा हा गो-पालकांचा समाज ईजिप्शियन, बाबिलोनियन इ. समकालीन समाजांपेक्षा थोडा मागासलेलाच होता. भाषावैज्ञानिकांनी उत्तरकालीन समकुलीन भाषांतील शब्द व रूपांच्या आधारावर तौलनिक पुनर्रचन पद्धतीने, वीरांच्या जीवनपद्धतीचे सम्यक चित्र उभे केलेले आहे. हे वीर म्हणजेच आदिआर्य. कोंकणीभाषी समाजाचे हे ज्ञात असे प्राचीनतम पूर्वज होत.

गाय, बैल, शेळी, बोकड, मेंढी, घोडा, गावडुक्कर हे आदिआर्यांचे पशुधन होते. त्यांनी कुत्र्यास माणसाळविले होते, परंतु मांजराची त्यांस माहिती नव्हता. लांडगा, अस्वल, कोल्हा, रानमांजर, पाणमांजर यांचा त्यांस परिचय होता, परंतु वाघ, सिंह, हत्ती, चित्ता, माकड, उंट हे प्राणी त्यांनी पाहिलेले नव्हते. त्यांना कुक्कुटपालन माहित नव्हते. समुद्र पाहिलेला नव्हता. गोड्या पाण्यातील मासे ते भक्षण करीत. वड व पिंपळ त्यांनी पाहिलेले नव्हते. मध व सोमरस प्राशनाची त्यांना आवड होती. संख्यांसाठी ते दशमान पद्धतीचा वापर करीत. परशू, कुऱ्हाड, धनुष्यबाण, भाला व आखूड तलवार ही त्यांची हत्यारे होत. कुटुंबाचा आकार मोठा असे. हुंडा देण्याघेण्याची पद्धत होती. देवांमध्ये अग्नी, उषा, वरूण, देवपिता (ज्युपिटर), देवमाता या देवतांचे प्रस्थ होते. त्यांस पशुबळी देत. प्रेते पुरीत. पितरांची पूजा करीत. अनेक कुळे मिळून टोळी तयार होई. टोळीचा प्रमुख 'जंतुपति' असे. अनेक टोळ्यांचा प्रमुख राजा असे. युद्धे नेहमीच होत. लुटालुट, बदला घेणे हेही प्रकार चालत.



लोकसंख्या विस्फोट, सततचे आवर्षण वा अतिवर्षण, रोगाची साथ यांसारख्या कोणत्यातरी अज्ञात कारणाने आदिआर्यांना आपले मूलस्थान सोडून यूरोप व मध्य-आशिया खंडातील नवीन प्रदेशांत स्थलांतर करावे लागले. त्यांच्या काही टोळ्या इराण, अफगाणिस्तान या प्रदेशात आल्या.

सुमारे 3500 वर्षांपूर्वी इराण-अफगाणिस्तानमध्ये राहणाऱ्या आर्यांच्या काही टोळ्यांनी वायव्येकडील दुर्गम पर्वतमय मार्गाने भारतात स्थलांतर करण्यास प्रारंभ केला. स्थलांतर करणारा हा समाज एकजिनसी होता असे समजण्याचे कारण नाही. त्यांच्यातही भाषा, व्यवसाय, चालीरिती इ. बाबतींत विविधता होती. हे स्थलांतर शतकानुशतके चालू होते. हजारो वर्षांच्या प्रदीर्घ कालखंडात एकमेकांस खो देत-घेत त्यांनी हिमाद्रीपासून विंध्याद्रीपर्यंतचा प्रदेश व्यापून टाकला. इराण-अफगाणिस्तानात मुक्कामास आलेल्या आर्यांची भाषा इंडो-इरानियन या नावाने ओळखली जाते. या भाषेपासूनच पुढे पारशांच्या धर्मग्रंथांची भाषा अवेस्तन व ऋग्वेदाची भाषा वैदिक संस्कृत या उत्क्रांत झाल्या.

आर्यांच्या भारतप्रवेशापूर्वी या देशात नाना वंशांचे, नाना संस्कृतींचे व नाना भाषा कुलांचे लोक रहात होते. यातील निग्रिटो वंशाचे लोक अंदमानातील आदिवासींमध्ये आजही आढळून येतात. अंदमानी ही अवर्गीकृत भाषा आहे. तिचे साम्य इतर कोणत्याही भाषेशी दाखविता येत नाही. ऑस्ट्रिक वंशाच्या लोकांनी पूर्व व मध्य भारताचा विस्तृत प्रदेश व्यापलेला होता. खासी, निकोबारी, संताळी, मुंडारी, हो, खडिया, सोरा, कोरकू इ. ऑस्ट्रिक भाषा आजही बोलल्या जातात. नारळ, कर्दळ, हळद, सुंठ, वांगे, तांबुल इ. अनेक ऑस्ट्रिक शब्दांचे आदान अन्य भारतीय भाषांतून झालेले आढळते. 'गंगा' हा मूलत: नदीवाचक ऑस्ट्रिक शब्द होय. ऑस्ट्रिक भाषाकुलाच्या भारतीय उपकुलाला ऑस्ट्रो-एशियाटिक असे अभिधान आहे. आर्यांनी आस्ट्रिक लोकांची भलावण 'निषाद' म्हणून केलेली आढळते.

'किरात' म्हणून आर्यांना परिचित असलेले लोक आजही हिमालयाच्या पायथ्याशी व ईशान्य भारतात आढळून येतात. यांत लडाखी, लाहुली, भूतानी, बोडो, गारो, त्रिपुरी, मणिपुरी, कुकी, मिश्मी इ. तिबेटो-बर्मी भाषा बोलणाऱ्या लोकसमूहांचा समावेश होतो.

आर्यांच्या आगमनापूर्वी बलुचिस्तान पासून ओरिसा पर्यंतच्या भूभागात व दक्षिण भारतात द्राविड वंशाचे लोक रहात होते. बलुचिस्तानात बोलली जाणारी ब्राहुई ही द्राविडी परिवाराची

भाषा होय. मध्य भारतातील कुडुख, माल्टो, कुई, गोंडी, कोलामी या देखील द्राविड परिवाराच्याच भाषा होत. दक्षिण भारतामध्ये तमिळ, तेलुगु, कन्नड, मल्याळम, तुळु, तोडा कोटा, बडगा, कोडगु इ. द्राविड भाषा बोलल्या जातात. मोहेंजोदडो व हडप्पा येथील आर्यपूर्व संस्कृती द्रविडांचीच असावी असे एक प्रमेय आहे. आजची भारतीय संस्कृती ही प्रामुख्याने आर्य व द्रविड संस्कृतींच्या संगमांतून विकसित झाली आहे.

आर्य भारतात येण्यापूर्वी निग्रिटो, ऑस्ट्रिक, तिबेटोबर्मी व द्रविड यांच्या बरोबरच पश्चिम भारतामध्ये भिल्ली संस्कृती नांदत असावी असा कयास करता येतो. भिल्ल, मावची, कोंकणे, वारली, कातकरी, महादेव कोळी, बैगा, हळबा, निहाल इ. आदिवासी जमातींच्या भाषांमध्ये आढळून येणारा वैशिष्ट्यपूर्ण निम्नस्तर, त्यांच्या लोकसाहित्यात आढळून येणारे भिन्न कल्पनाबंध व त्यांची विशिष्ट शारीरिक ठेवण याची साक्ष आहेत.

भूसंपादनासाठी व सत्तासंपादनासाठी आल्या आल्या आर्यांना एतद्देशीय लोकांशी सामना करावा लागला. वेद, महाकाव्ये, पुराणे यामधील कथांतून या संघर्षाचे प्रत्यंतर येते. आर्येतर आदिवासींना व प्रारंभी आलेल्या आर्यांना पंजाब, गंगासिंधूचे खोरे यांतून अन्यत्र रेटण्याचे कार्य अनेक शतके चालू होते. या रेटारेटीमध्ये प्रारंभी आलेले आर्य पूर्वेस बंगालमध्ये व दक्षिणेस कोंकणामध्ये रेटले जाऊन तेथे कायमचे स्थिर झाले. कोंकणी व बंगाली भाषांत आढळणाऱ्या बऱ्याचशा साम्याचे स्पष्टीकरण या एकमूलतेतून व समांतर विकसनातून देता येते. वैदिक आर्यांतील ब्राह्मणवर्गात मांसाहार व मत्स्याहार निषिद्ध नव्हता. सारस्वत व बंगाली ब्राह्मणांस मांसाहार व मत्स्याहार विशेष प्रिय का याचा उलगडा या संक्रमण वैशिष्ट्यामध्ये शोधता येतो.

आर्य कोंकणात येण्यापूर्वी तेथे कातकरी, कोळी, वारली, ठाकूर, धनगर, गवळी या लोकांची वस्ती होती. या प्रदेशातील अनेक प्राचीन देवस्थानांचे मूळ पुजारी महादेव कोळी, धनगर व गवळी आहेत. ब्राह्मण, कायस्थ आदी आर्यांनी त्यांच्या देवतांना आपलेसे केले. कोळ्या-गवळ्यांचे देव आर्यांचे कुलस्वामी वा कुलस्वामिनी झाले. गोव्यातील मल्लिकार्जुन देवस्थानाचे महापुजारी वेळीप हे तेथील आर्यपूर्व वसाहतकार होते. गोमंतकीयांचा प्रियातिप्रिय मंगेश हा मुळात धनगरांचा देव होता.

कोंकणातील गावडे, कुणबी, भंडारी, आगरी इ. कृषीवल मंडळीही मूळची आर्यच होत. यांच्यापैकी काही जमातींचा स्थलपरत्वे एतद्देशीय द्रविड व समुद्रमार्गे आलेल्या सिथियन,

ॲबिसिनियन, इजिप्शियन व अरब लोकांशी मोठ्या प्रमाणावर संकर झाला. कोंकणातील महारांची दणकट व उंच शरीरयष्टी आणि ग्रामरक्षणाचा व्यवसाय ध्यानात घेता ते 'महाआर्य' का, हे सहज ध्यानात यावे. त्यांच्या नावापुढे लावण्यात येणारे '-नाक' हे पद (शिदनाक, मायनाक, म्हादनाक इ.) शिलाहार आणि यादवांच्या शिलालेखांत देखील आढळून येते. त्यावरून ते 'नायक' श्रेणीचे आर्य असावेत असा कयास करता येतो. देशावरील आर्यांची वस्ती ही कोंकणाहून अर्वाचीन होय. तेथील लोकवस्तीत 'महारथी' (मराठे) क्षत्रियांचे प्राबल्य होते. महाराष्ट्रातील बहुसंख्य राजघराणी याच लोकांची आहेत.

परशुराम हा बऱ्याच उशीरा कोंकणात वसाहतीस आलेल्या ब्राह्मणबहुल टोळक्यांचा पुढारी होय. भूसंपादनासाठी त्यास अगोदर येऊन स्थायिक झालेल्या क्षत्रियबहुल टोळक्यांशी 21 वेळा दोन हात करावे लागले.

भाषा ही एक नित्य-परिवर्तनशील अशी संप्रेषण-पद्धती आहे. इंडोयूरोपियन भाषा बोलणाऱ्या आदिआर्यांनी भिन्न दिशांना स्थलांतरे केल्यानंतर त्यांची भाषा वेगवेगळ्या तऱ्हेने परिवर्तित होत राहिली. त्यातून नवनवीन भाषा उद्भूत झाल्या. त्यांची गणना दहा शाखा वा उपकुलांतून करण्यात येते. या शाखा पुढीलप्रमाणे होत :-

| | | |
|---|---|---|
| 1. इंडो-इराणी | 2. बाल्टो-स्लाविक | 3. आर्मिनियन |
| 4. आल्बेनियन | 5. ग्रीक | 6. लॅटिन |
| 7. जर्मॅनीक | 8. केल्टिक | 9. तोखारियन |
| 10. हिटाइट | | |

यांतील इंडोइराणी शाखेचे स्वतःस आर्य म्हणवून घेणारे लोक काही शतके इराणमध्ये वस्ती करून भारतात स्थलांतरित झाले. त्यांच्या भाषेला संस्कृत हे नाव मिळाले. या भाषेचे अतिप्राचीन स्वरूप ऋग्वेदाच्या 2 ते 9 या मंडलांत आढळून येते. या भाषेची व्याकरण-व्यवस्था खूप जटिल होती. वैदिक संस्कृतची वर्णव्यवस्थाही संपन्न असून त्या भाषेत सुराघातास फार महत्व होते. पाणिनीच्या काळापर्यंत म्हणजे जवळजवळ हजार वर्षांमध्ये या भाषेत अनेक फेरबदल घडून आले. तिचे नवे स्वरूप काव्यनाटकादी अभिजात संस्कृत साहित्यात दिसून येते.

कालगतीनुसार संस्कृत भाषा जनसामान्यांच्या भाषेपासून दूर जाऊन संस्कारित स्वरूपा शिल्लक राहिली. यावेळी जनसामान्यांच्या भाषांस महत्व चढले. या भाषांस प्राकृत हे ना मिळून बुद्ध-महावीरांच्या काळात त्यांमध्ये धर्माची शिकवण देण्यास प्रारंभ झाला. प्राकृ भाषांचा कालखंड इ.स.पूर्व 600 ते इ.स. 1000, म्हणजे जवळजवळ 1500 वर्षे इतका प्रदीघ होता. संस्कृत, प्राकृत व तदुत्पन्न अर्वाचीन भाषांस इंडो-आर्यन अथवा आर्यभारतीय भाष असे संबोधिले जाते. कोंकणी ही आर्यभारतीय उपकुलाची भाषा होय.

प्राकृत भाषांची पहिली अवस्था बौद्ध धार्मिक वाङ्मयाची भाषा पालि व अशोकाच्या देशभर पसरलेल्या शिलालेखांच्या मजकूरात पाहण्यास मिळते. दुसऱ्या टप्प्यात अर्धमागधी, मागधी, शौरसेनी, पैशाची, गांधारी प्राकृत इ. बोलींचा उदय झालेला दिसतो. त्याच्याही पुढील टप्प्यावर महाराष्ट्री प्राकृत व अपभ्रंश यांचा प्रारंभ होताना दिसतो. या काळात संस्कृत ही धर्मकांडाची आणि ग्रंथलेखनाची भाषा; प्राकृत ही शिष्टजनांची व्यवहार भाषा; व अपभ्रंश ही जनसामान्यांची बोलभाषा अशी अवस्था आलेली दिसते.

महाराष्ट्री ही मुळात महाराष्ट्राची प्राकृत बोली होय. हिचा पुढे खूप प्रसार होऊन, तिला महाराष्ट्राबाहेरही मान्यता प्राप्त झाली. संस्कृत नाटकांतून उच्च श्रेणीच्या स्त्रीपात्रांच्या संभाषणासाठी व गीतरचनेसाठी महाराष्ट्री प्राकृतचा उपयोग करण्याची प्रथा होती. कालिदासाच्या 'अभिज्ञान शाकुंतलम्' मध्ये शकुंतला महाराष्ट्री भाषेत बोलते. प्रवरसेनाचा 'सेतुबंध' (रावणवध), हालाची 'गाथा सप्तशती', वाक्पतीचे 'गौडवाह', पुष्पदंताचे 'हरिवंशपुराण' इ. ग्रंथांतून या प्राकृतचे दर्शन घडते. शातवाहनांच्या काळात महाराष्ट्रीला राजभाषेचे महत्व प्राप्त झाले.

इसवी सनाच्या सहाव्या शतकापासून दहाव्या शतकापर्यंतच्या काळात प्राकृत भाषांच्या संरचनेत खूप फारफेर होऊन त्या अपभ्रंश वा जनसामान्यांच्या बोली म्हणून ओळखल्या जाऊ लागल्या. यांतील शौरसेनी अपभ्रंशापासून पश्चिमी हिंदी (बुंदेली, कनौजी, ब्रज, बांगरू, खडीबोली इ.); नागर अपभ्रंशापासून राजस्थानी, गुजराती, माळवी इ.; अर्धमागधी अपभ्रंशापासून पूर्व हिंदी (अवधी, बघेली, छत्तिसगढी); मागधी अपभ्रंशापासून असामी, बंगाली, उडिया, बिहारी (मैथिली, मगही, भोजपुरी); व्राचड अपभ्रंशापासून सिंधी; केकय अपभ्रंशापासून पंजाबी; आणि महाराष्ट्री अपभ्रंशापासून मराठी व कोंकणी या अर्वाचीन आर्यभारतीय भाषा उदय पावल्या.

1971

अपभ्रंश भाषांचा निर्देश तत्कालीन ग्रंथांमधून 'देशी भाषा' असा केला जाई. इ.स.८०० च्या सुमारास लिहिल्या गेलेल्या कोऊहल कवीच्या 'लीलावई' (लीलावती) या काव्याची भाषा 'मरहट्ठ देसी भासा' आहे असे स्वत: कवी सांगतो. या काव्यात मराठी व कोंकणी या सहोदर भाषांच्या पूर्वरूपाचे दर्शन घडते. विशेष म्हणजे, कोंकणीतील प्रथम पुरुषवाचक सर्वनाम 'हांव' हे या काव्यात 'हं' या स्वरूपात वापरात असलेले दिसते. (उदा. भणितोऽहं > भणिओ हं). मराठी 'मी' चे मूळ मात्र अन्यत्र शोधावे लागते.

लीलावईतील अनेक शब्द, शब्दरूपे व वाक्प्रचार यांमधून महाराष्ट्री अपभ्रंशाच्या उदरी कोंकणी व मराठी या भाषा जन्मास येत असल्याची चाहूल लागते. उदा. णक्क (नाक), गोणी (पोते), डोहल्या (डोहाळे), कच्छद्वय (कासोटा), पइट्ठाण (पैठण), एक्कमेक्कं (एकमेक), उत्तावलो (उतावळा), लज्जलुया (लाजाळू), तुम्हांचियाइ (तुमच्या), मुणेऊण (म्हणून), सुणेऊण (ऐकून), भणिऊण (सांगून), मणे हसियं (मनात हसणे), दीसिउं पवत्ता (दिसू लागणे, उजाडणे) इ.

संक्रमणाची ही प्रक्रिया सुमारे दोन शतके चालल्यानंतर दहाव्या शतकाच्या अखेरीस कोंकणी ही लोकसंवादनाची भाषा म्हणून उदयास येते. परंतु राजाश्रय वा धर्मपीठाश्रय यांच्या अभावी यौवनात येण्यास तिला तब्बल पाचशे वर्षे वाट पहावी लागते. धालो, ज्योत, तळी, गाऱ्हाणे इत्यादी बाळक्रीडांत रमणारी ही किशोरी कृष्णदास शाम्याने घडविलेली लेणी लेवून लाजत मुरकत समोर येते व दोमिनिकन, फ्रांसिस्कन, जेजुइत पंथांच्या पाद्रयांच्या हाकेस साद देत येशूच्या गुणगानात रममाण होते.





प्रकरण चौथे

# कोरीव लेखांतील कोंकणी

मराठी भाषेतील आद्य शिलालेख म्हणून ज्याची भलावण केली जाते तो श्रवणबेळगोळ येथील गोमटेश्वराचा शिलालेख मराठी भाषेत कोरलेला नसून कोंकणी भाषेत कोरलेला आहे, हे एक ऐतिहासिक सत्य होय.

कर्नाटक राज्याच्या हसन जिल्ह्यात श्रवणबेळगोळ हे गाव आहे. या गावातील दोड्ड बेट्ट नावाच्या टेकडीवर 57 फूट उंचीचा, अखंड दगडात घडविलेला गोमटेश्वराचा पुतळा आहे. गोमटेश्वर हा जैनांचा पहिला तीर्थंकर आदिनाथ याचा सुपुत्र होय. यास मदनाचा अवतार समजतात. भव्यता, दिव्यता व सौंदर्य या तिन्हींचा साक्षात्कार घडविणारे असे शिल्प उभ्या दुनियेत कोठेही नाही. या पवित्र शिल्पाच्या पायाशी कोंकणी भाषेचा आद्य लेख गेली सहस्त्र वर्षे तिच्या प्राचीनतेची साक्ष देत विनम्रपणे उभा आहे.

या लेखाच्या एकूण पाच ओळी असून, त्यांतील पहिल्या तीन ओळी गंगवंशीय नृप राजमल्ल (चौथा) याचा प्रधान चामुंडराज याने कोरविलेल्या आहे; तर दुसऱ्या दोन ओळी होयसळवंशीय नृप विष्णुवर्धन याचा प्रधान गंगराज याने कोरविलेल्या आहेत. या दोन प्रधानांच्या कारकीर्दींचा मागोवा घेऊन पहिल्या तीन ओळी इ.स.983 च्या सुमारास व दुसऱ्या दोन ओळी इ.स.1118 च्या सुमारास कोरविल्या गेल्या असा विद्वानांनी तर्क केला आहे.

योगायोग असा की, ज्या गंगवंशीय नृपांच्या गंगवाडी प्रदेशात हा शिलालेख कोरलेला आहे, त्या पश्चिमी गंगवंशाचा आद्यपुरुष काण्वायन गोत्री नृप 'कोंगणिवर्मन' हा होता. इ.स.400 च्या सुमारास दक्षिण कर्नाटकावर कोंकणी नृपाचे अधिराज्य होते याचीच ही साक्ष होय. गंगांचे आणि कदंबांचे शरीरसंबंधही होते.

## कोंकणी भाषेतील आद्य शिलालेख

**चामुंडराज व गंगराज यांचा श्रवणबेळगोळ शिलालेख**

**इ. स. 983**

या शिलालेखाचे प्रथम वाचन लेविस राईस यांनी इ.स. 1889 मध्ये केले. ते त्याच्या ठशासह एपिग्राफिया कर्नाटिका या ग्रंथाच्या दुसऱ्या खंडात प्रसिद्ध झाले आहे. (लेख क्र.179, 180; प्रतिमा क्र.71). राईस यांच्या माहितीचा उपयोग करून वि.का.राजवाडे, वि.ल.भावे, द.वा.पोतदार, चिं.ग.कर्वे, शं.गो.तुळपुळे इ. मराठी पंडितांनी या शिलालेखावर बरेच लिखाण केले आहे. मराठी भाषेची प्राचीनता व विस्तार यांचा उदोउदो करण्यासाठी हे एक मोठेच साधन त्यांच्या हाती लागले. हा लेख कोंकणी भाषेत (किंवा त्यांच्या समजुतीप्रमाणे मराठी भाषेच्या गोमंतकी बोलीत) असू शकतो असा संशय देखील कोणी व्यक्त केला नाही.

मध्यंतरी हुल्ट्झ नावाच्या विद्वानाने हा सर्वच लेख एकाच वेळी कोरविला गेला असे अनुमान करून त्याचा काळ इ.स. 1116-17 वर आणून ठेवला. झाले, तुळपुळ्यांनीही मग मराठीच्या आद्य म्हणून गणलेल्या या शिलालेखाची उचलबांगडी करून त्यास चौथ्या क्रमांकावर

आणून ठेवले ! वस्तुत: या शिलालेखाच्या पहिल्या तीन ओळी व दुसऱ्या दोन ओळी यांत अक्षरवटिकेत पुष्कळच फरक आहे. विशेष म्हणजे यांतील चामुंडराजाचा शिलालेख कन्न तामिळ व कोंकणी अशा तीन भाषांत कोरलेला असून त्यांतील अनुस्वारांची टिंबे तिन्ही ओळ भरीव आहेत. गंगराजाचा शिलालेख हा कन्नड व कोंकणी या भाषांत लिहिलेला असून त्यांत दोन्ही ओळीत अनुस्वाराची टिंबे पोकळ आहेत. या कारणांनी या शिलालेखाचे लेखन एक वेळी झाले या प्रतिपादनात काहीच तथ्य नसून त्याचा काळ अलीकडे ओढण्यास कोणते सबळ कारण दिसत नाही.

गोमटेश्वराच्या शिलालेखाचा पूर्वार्ध पुढीलप्रमाणे आहे :

| | |
|---|---|
| **श्रीचामुण्डराजं माडिसिदं** | (कन्नड) |
| **श्रीचामुण्डराजं शेय्व्वित्तान्** | (तामिळ) |
| **श्रीचावुण्डराजें करवियलें** | (कोंकणी) |

पूर्वार्धातील पहिली ओळ हळेगन्नड लिपीत, दुसऱ्या ओळीतील पहिला शब्द ग्रंथ लिपीत तर दुसरा शब्द वट्टेझुत्तु लिपीत व तिसरी ओळ नागरी लिपीत कोरलेली आहे.

लेखाच्या उत्तरार्धातील दोन ओळी पुढीलप्रमाणे आहेत:

| | |
|---|---|
| **श्रीगंगराज सुत्तालयवं माडिसिद** | (कन्नड) |
| **श्रीगंगराजे सुत्ताले करवियले** | (कोंकणी) |

गंगराजाच्या लेखातील पहिली ओळ हळेगन्नड लिपीत, तर दुसरी नागरी लिपीत आहे.

लेखाचा अर्थ स्पष्ट आहे. पूर्वार्धात गोमटेश्वराचे शिल्प चामुंडराजाने घडविल्याची माहिती आहे; तर उत्तरार्धात शिल्पाभोवतीच्या प्राकाराची तटबंदी गंगराजाने बनविल्याचे वृत्त आहे.

गोमटेश्वराच्या शिलालेखातील 'श्रीचावुण्डराजें करावियलें' व 'श्रीगंगराजे सुत्ताले करवियले' या नागरी लिपीतील दोन ओळी लेविस राईस यांना अर्धमागधी वा गुजराथी भाषेच्या असाव्यात असे वाटले. पुणेरी पंडितांना त्या मराठी भाषेच्या वाटल्या. परंतु ते सिद्ध करण्यासाठी त्यांना अनेक कोलांट उड्या माराव्या लागल्या. हा लेख कोंकणी भाषेचा आहे हे प्रमेय अनेक पुराव्यांनिशी प्रथमच पुढे येत आहे.

श्रवणबेळगोळ हे ठिकाण कर्नाटकाच्या दक्षिण टोकाकडील हसन जिल्ह्यात आहे. मराठी प्रदेशापासून अतिदूर असलेल्या या ठिकाणी मराठी भाषेत व नागरी लिपीत लेख लिहिण्याचे चामुंडराजास व गंगराजास कोणतेही प्रयोजन असण्याचे कारण नाही. तत्कालिन राष्ट्रकूट, चालुक्य, वा यादव राजवटीतील मराठीभाषी मंडळी इतक्या दूरच्या प्रदेशात लेख कोरण्यास वा वाचण्यास जाणेही संभवनीय दिसत नाही. या परिस्थितीत आजही बदल झालेला नाही.

या लेखाचे एकमेव प्रयोजन म्हणजे स्थानिक लोकांस शिल्प व प्राकाराचे काम कोणी केले हे समजावे हे होय. श्रवणबेळगोळच्या पूर्वेकडील प्रदेशात कन्नड-तमिळ द्वैभाषिक मंडळी व पश्चिमेकडील मंगळूर जिल्ह्यात कन्नड-कोंकणी द्वैभाषिक मंडळी आजही लाखोंनी आहेत. तेव्हाही होती. आपल्या कन्नड, तामिळ व कोंकणी प्रजेमध्ये आपले नाव व्हावे हा चामुंडराज व गंगराज यांचा हेतू गैर कोण म्हणेल? आपली कीर्ती दूरदूरच्या देशी पसरावी असा हेतू असता तर त्यांनी हा लेख संस्कृत किंवा जैन मार्गाची भाषा अर्धमागधीमध्ये कोरविला असता. मराठीमध्येही कोरविला असता. स्थानिक भाषांची निवड ही मर्यादित प्रयोजनापोटी आलेली आहे. या लेखातील नागरी लिपीतील दोन्ही ओळी मंगळूर-कोचीनकडील सारस्वत, कऱ्हाडे व कुडुंबी यांच्या कोकणी भाषेतील आहेत. ज्यावेळी एखाद्या भाषेचे प्रमाणीकरण झालेले नसते त्यावेळेस त्या भाषेच्या भाषकांनी लेखनासाठी आपल्या बोलीचा वापर करणे अत्यंत स्वाभाविक होय. श्रवणबेळगोळ येथील लेख याच कारणाने स्थानिक पंडितांनी स्वबोलीत लिहिला व कोरविला.

गोमटेश्वराच्या शिलालेखात एकूण चार भिन्न शब्द आहेत. 1) श्रीचावुण्डराजें 2) श्रीगंगराजे 3) सुत्ताले 4) करवियलें (~ करवियले). त्यांची थोडी भाषिक चिकित्सा करणे क्रमप्राप्त होय.

पहिल्या दोन शब्दांतील 'श्री'कार हा चामुंडराज व गंगराज या व्यक्तींच्या वैभवाचा निदर्शक आहे. शिलालेखात याचा आकार दीड फूट एवढा असून इतर अक्षरे उत्तरोत्तर बारीक होत गेलेली दिसतात. या 'श्री' चे वळण दक्षिणेकडे प्रचारात असलेल्या तत्कालीन नंदिनागरी या नागरी लिपीच्या शैलीतील 'श्री' प्रमाणे आहे. महाराष्ट्रातील प्राचीन शिलालेखांत आढळणाऱ्या 'श्री' चे वळण याहून भिन्न आहे. 'श्री'प्रमाणेच 'च,ज,ण,र' या अक्षरांची वळणेही नंदिनागरीच्या प्राचीन शैलीप्रमाणे असल्याने त्यांचा लेखक दक्षिणेकडे वास्तव्य करणारा पंडित असावा, हे स्पष्ट होय. त्या काळात दक्षिणेकडे होणारे संस्कृत भाषेचे लेखन 'प्राचीन नंदिनागरी' व 'ग्रंथ' या दोन्ही लिपींतून होई. दहाव्या शतकात कोंकणीचे लेखन नंदिनागरी लिपीच्या प्राचीन शैलीमध्ये

होत असे, हे यावरून अनुमान निघते. पहिल्या शब्दातील लेखनात अनुस्वाराऐवजी. 'ण' असा परसवर्णाचा वापर केलेला आढळतो. ही देखील एक कोंकणी लकब होय. तामिळ कन्नड भाषांतील ओळींत अनुस्वारयुक्त 'मुं' आहे.

प्राकृत शब्दांतील स्वरमध्य 'म' चे 'व' मध्ये परिवर्तन होण्याची प्रक्रिया कोंकणी भाषे मराठीच्या दोन–तीन शतके अगोदरच सुरू झाली होती, हे या शिलालेखावरून दिसून येते. प्रक्रियेमुळे प्रस्तुत लेखातील 'चामुंडराज' हा 'चावुण्डराज' झाला. तमिळ व कन्नड लेखांत 'चामुंडराज' हेच रूप आढळून येते.

इ.स.1060 मधील दिवेआगर ताम्रपटात देखील म > व ही प्रक्रिया आढळून येते रायगड जिल्ह्याच्या श्रीवर्धन तालुक्यात दिवेआगर हे गाव आहे. या गावाच्या दक्षिणेकडील कोंकणपट्टीत चित्पावनांची मोठी वस्ती आहे. बाळाजी विश्वनाथ भट याच प्रदेशातून देशाव गेला. या चित्पावन ब्राह्मणांची मूळ बोली चित्पावनी होय. ही कोंकणी भाषेची बोली असू सानुनासिकत्व हा तिचा विशेष आहे. चिपळूणपासून कोचीनपर्यंतच्या प्रदीर्घ पट्ट्यात आजह ही बोली काही कुटुंबांतून बोलली जाते. दिवेआगर ताम्रपटाची भाषा चित्पावनी होय, हे त्य ताम्रपटातील सानुनासिकत्वाचे प्राबल्य व 'घैसास' आणि 'देवल' आडनावाच्या कोंकणस्थ चित्पावन ब्राह्मणांच्या निर्देशावरून सहज कळून येते. या ताम्रपटातील म > व प्रक्रियेचे 'दावोदर:पासि हे रूप या तर्कास पुष्टिकारक आहे. म > व प्रक्रियेचा मराठी भाषेतील पहिला नमुना कृष्णदेव यादवाच्या तासगाव ताम्रपटातील गावु (ग्राम) या शब्दात आढळतो. पुढील काळात ही प्रक्रिया स्थिरावून मराठीतील अवंस (अमावस्या), नांव (नाम), हिंव (हिम), सांवतु (सामन्त), आंवळा (आमलक) अशा अनेक शब्दांतून कार्यरत झालेली दिसते.

'एं' कारान्त तृतीयेची रूपे प्राचीन मराठीत व प्राचीन कोंकणीत विपुलतेने आढळतात. सांप्रत त्यांचा आढळ मात्र कोंकणीतील हांवें, तुंवें (~ हांयें, तुंयें) या सार्वनामिक रूपांतूनच दिसून येतो. गोमटेश्वराच्या शिलालेखातील 'चावुण्डराजें' या शब्दातील '–एं' या प्रत्ययामधील अनुस्वार 'गंगराजे' या शब्दात आढळत नाही. यामुळेच या लेखातील दोन्ही कोंकणी ओळी भिन्न काळी कोरल्या गेल्या असाव्यात असा तर्क करता येतो.

गोमटेश्वराच्या शिलालेखातील 'सुत्ताले' हा शब्द मराठी भाषेच्या कोणत्याही बोलीत व कोणत्याही कालखंडात वापरलेला आढळत नाही. मुळात हा शब्द कन्नड असून मराठी

भाषेत त्याचे केव्हाच आदान झालेले नाही. या शब्दाचा कन्नड भाषेतील अर्थ 'प्राकार, आवार, पवळी' असा आहे. कन्नडमध्ये 'सुत्तु' या धातूचा अर्थ 'वेढणे, गुंडाळणे, आवरणे' असा असून त्यापासून 'सुत्तुमुत्तु' (चोहीकडून), 'सुत्तिगे' (फेरा), 'सुत्तु' (प्रदक्षिणा), सुत्तुवरि ( प्रदक्षिणा घालणे), सुत्तुवळय (चोहीकडे), सुत्तोऽले (परिपत्रक) इ. शब्द व्युत्पादिले जातात. किटेल यांनी आपल्या कन्नड-इंग्रजी कोशात 'सुत्ताले' हा शब्द 'सुत्तु+आलय' या कन्नड संस्कृत व्यामिश्र जोडशब्दापासून व्युत्पादिलेला असून त्याचा अर्थ 'देवळासभोवतीची भिंत' असा दिलेला आहे. राजवाडे यांनी 'सुत्त+ताल' या स्वरूपाच्या जोडशब्दापासून त्याचे निर्वचन केले आहे.

प्राचीन किंवा अर्वाचीन मराठी साहित्यात या शब्दाचा कोठेच आढळ होत नाही. परंतु कन्नड भाषेने वेढलेल्या मंगळूर व कासरगोडकडील कोंकणी बोलींतून हा शब्द हजार वर्षांपूर्वीच आदत्त झालेला आहे. चित्रापूर-सारस्वतांच्या कोंकणी बोलीत 'सुत्तु' म्हणजे 'सभोंवती' होय. कासरगोडमधील कुडुंब्यांच्या कोंकणी बोलीत 'सुत्तला' हे विशेषण 'वाटोळा' या अर्थी वापरतात. याच प्रदेशातील कऱ्हाडी या कोंकणी बोलीत 'सुत्तले' हे क्रियाविशेषण 'सभोंवती' या अर्थाने वापरात आहे. ही सर्व वस्तुस्थिती स्पष्ट करते की गोमटेश्वराचा शिलालेख कर्नाटकातील कोंकणी भाषिकांसाठी कोरला गेला व त्यांनाच या 'सुत्ताले' शब्दाचा अर्थ कळत होता व आजही कळतो.

गोमटेश्वराच्या शिलालेखातील 'करवियलें' हे दुहेरी प्रयोजकाचे भूतकाळी रूपही असेच चिंत्य होय. 'अय' हा एकेरी प्रयोजकाचा प्रत्यय व 'अवय' हा दुहेरी प्रयोजकाचा प्रत्यय ही एक खास कोंकणी बाब आहे. आजही मंगळूर व कोचीनकडील कोंकणी बोलींतून 'घाल्लयिलँ,' 'घेवयिलँ', 'पीवयिलँ', बसकारयिलँ, भोवण्डायिल्लँ, भोवण्डावयिलँ, धांवडायिलँ, भेत्तयृतॉलॉ, भेत्तवयृतॉलॉ यांसारखी प्रयोजकाची रूपे सिद्ध होतात.

या धर्तीचे भूतकाळी कर्मणीरूप, 'ठवियली' हे इ.स.1060 मधील कोंकणीच्या चित्पावनी बोलीतील दिवेआगर ताम्रपटातच उपलब्ध होते. गोमटेश्वराच्या शिलालेखानंतर तब्बल तीन शतकांनी 'करवियलें' हे प्रयोजकाचे रूप मंगळवेढे येथील चंडिकाईच्या मराठी शिलालेखात आढळून येते. दक्षिणेकडील मराठीवर कोंकणीचा प्रभाव होता या वस्तुस्थितीचेच हे निदर्शक होय. प्रचलित मराठीत अशी रूपे होत नाहीत. परंतु प्रचलित कोंकणीत मात्र त्यांचा आढळ होतो.

श्रवणबेळगोळच्या गोमटेश्वराच्या शिलालेखाने कोंकणी भाषेच्या प्राचीनत्वा शिक्कामोर्तब केले आहे. कोंकणी भाषेचा तो ज्ञात असा आद्य अभिलेख होय. या अभिलेखात नागरी लिपीत लिहिलेल्या दोन्ही ओळी संपूर्णत: कोंकणी भाषेत आहेत; मराठी किंवा अ भाषेत मुळीच नाहीत. सहस्त्र वर्षांपूर्वीही कोंकणी भाषेची संरचना व शब्दसंपत्ती मराठी भाषे भिन्न होती याचा तो बलवत्तर पुरावा होय. या अभिलेखाने दाखवून दिले आहे, की कोंक भाषा ही मराठी भाषेहून प्राचीन व कमी परिवर्तनशील आहे. तिने आपले प्राचीन गुणविशे मोठ्या प्रमाणात जपून ठेवले आहेत. हजार वर्षांपूर्वीही कोंकणी भाषा लिहिली जाई व ती नाग लिपीत लिहिली जाई या वास्तवाला गोमटेश्वर साक्षी आहे.

दिवे – आगर ताम्रपट

इ. स. 1060

चित्पावनी कोंकणीचा प्राचीन नमुना



ओं स्वस्ति शक संवतु 982 सर्व्वरी संवसरे मार्ग्गसिर पौर्ण्णमास्यां शुक्रे ।। श्रीस्छितिपुरिचीं दोनि सासनें वासुदेवभट्टवांये षडंगवि रिसियप घैसास सीवू षडंगवि एतत्प्रमुखें स्छानें मावलभट्टं पासे: ठवियलीं ।। तथा सातावीसें सत सुवर्ण्ण: दावोदर: पासि ठवियलें। सु. गा: 127 सुर्व्व: योगक्षेमु स्छानहचा। दीवेचे रिसियपै पौंवदेव षडंवि तिकै षडंगवि जीवणै नागरुद्रभट्ट मधुवै षडंगवि मधुवय देवलु हे जाणति। जें सुवर्ण्ण लिहलें तें कांठेअ: समेत: ।।

## दिवे – आगर ताम्रपट

## इ. स. 1060

चौदाव्या शतकात कोंकणीचे लेखन हळेगन्नड लिपीतही होई. इ.स.1348 चा 'विमानमंत्री याचा ताम्रपट' या नावाने प्रसिद्ध असलेला खाटेग्राम ताम्रपट हळेगन्नड या कन्नड लिपीच्या प्राचीन शैलीत कोरलेला आहे. गोमंतकाच्या फोंडे तालुक्यातील वेरे या गावी सापडलेल्या मलिक बहादुर याच्या वेळच्या या ताम्रपटात कोंकणीची अनेक वैशिष्ट्ये आढळून येतात. म्हापसे येथे सापडलेला इ.स. 1352 मधील सामंत नागदेव याचा पल्लिका ताम्रपट, सत्तरी तालुक्यातील वेळूस येथे सापडलेला इ. स. 1402 मधील विजयनगरचा संगम हरिहर (द्वितीय) याच्या वेळचा रवळनाथाच्या देवळावरील शिलालेख, इ.स.1414 चा फोंडे तालुक्यातील बांदोडे येथे सापडलेला विजयनगरचा संगम देवराय (प्रथम) याच्या वेळचा नागेश्वर मंदिरातील शिलालेख हे सर्व अभिलेख नागरी लिपीत कोरलेले असून त्यांची भाषा कोंकणी आहे.

प्रारंभीची काही शतके मराठी व कोंकणी या भाषा परस्परांपासून फार दुरावलेल्या नव्हत्या या वस्तुस्थितीची साक्ष हे अभिलेख देतात. असे असले तरी अनेक अस्सल कोंकणी वैशिष्ट्यांचा त्यामधून आढळ होतो, हे देखील तितकेच खरे. सानुनासिकतेचे वैपुल्य; 'उनु' प्रत्ययान्त भूतकाळी कृदन्ते (लहुनु, होउनु, यउनु, म्हणउनु, करुनु, घेउनु, देउनु, भेजुनु); नामांची '–आन', '–ईन' प्रत्ययान्त तृतीयेची रूपे (गोपाळभटान, ग्रामान, संततीन, त्यान, पुजाऱ्यान); आमि, तुमि ही सर्वनामे इत्यादि वैशिष्ट्ये हे अभिलेख मराठी नसून कोंकणी आहेत याबद्दल ग्वाही देतात.

मराठी व कोंकणी या भाषा महाराष्ट्री अपभ्रंशाच्या उत्तरेकडील व दक्षिणेकडील अशा दोन भिन्न बोलींमधून स्वतंत्रपणे विकसित झाल्या. मराठी भाषेचे व्यवहार-क्षेत्र विस्तृत व भाषकांची संख्या फार मोठी असल्याने ती जन्मानंतर लवकरच साहित्यालंकृत झाली व त्वरेनें परिवर्तित होत गेली. कोंकणीचे भाषाक्षेत्र संकुचित व पृथक्कोषांत विखुरलेले, भाषकांची संख्या तुलनेने कमी, अस्थिर समाजजीवन, व फिरग्यांची मुस्कटदाबी यामुळे तिचे परिवर्तन व तिचा विकास मंदगतीने झाला. या वस्तुस्थितीचे आकलन नसलेले अनेक मराठी पंडित कोंकणी ही मराठीची बोली आहे, हे गृहित प्रमेय सिद्ध करण्यासाठी प्राचीन मराठी साहित्यातून कोंकणी शब्दांच्या मोठमोठ्या याद्या काढून देतात. त्यांना हे कळत नाही, की मराठी व कोंकणी या समकुलीन व समस्त्रोतीय भगिनीभाषा असल्याने व कोंकणीने आपले प्राचीन स्वरूप मोठ्या प्रमाणात परिरक्षित केल्याने असे साम्य आढळणे अत्यंत स्वाभाविक होय. अशा सम-शब्दांच्या याद्या आर्यभारतीय भाषाकुलातील अन्य कोणत्याही भाषांच्या संदर्भात काढून दाखविता येतील.



प्रकरण पाचवे

# कोंकणीची शैशवावस्था

दहाव्या शतकापासून आपल्या वेगळ्या अस्तित्वाची जाणीव करून देणारी कोंकणी भाषा सतत पाचशे वर्षे मराठीच्या माजघरातच रांगत होती. कोणी तिला 'देशी भाषा' म्हणून संबोधित, कोणी गोमंतकीय 'ब्राह्मणांची भास' म्हणून ओळखीत, कोणी तिचा निर्देश 'कानारी' म्हणून करीत. 'कोंकोंनीं' म्हणून तिचा आद्य उल्लेख तॉमॅ पीरिश या पोर्तुगीज प्रवाश्याच्या 'सूम ओरिएंताल' या इ.स.1515 च्या सुमारास लिहिलेल्या ग्रंथात येतो. कोंकणीचे मराठी भाषेपासून असलेले वेगळेपण मिगेल-द-आल्मैद या पाद्रीबुवाला जाणवले होते. इ.स.1658 मध्ये लिहिलेल्या आपल्या 'वनवाळ्यांचॉ मळॉ' या पंचखंडात्मक कोंकणी महाकाव्यात सुरावली आणि धोंकुली या गावांची व्युत्पत्ती सांगताना तो 'मरास्ट भास' 'फिरंगी भास' व 'कोंकणी भास' असा स्पष्ट भेद करतो.

कोंकणीचे वेगळेपण संत नामदेवांच्या तीक्ष्ण क्षोत्रांना जाणवले होते. त्यांच्या एका अभंगात गोकुळातील खोडकर बाळकृष्णाने नदिस्नानात रममाण झालेल्या कानडी, मुसलमानी, मराठी, कोंकणी व गुजरणी अशा पंच-गवळणींची वस्त्रे कशी पळविली याची कथा आलेली आहे. विशेष म्हणेज या पंच-गवळणी आपापल्या भाषेत कृष्णाची विनवणी करून वस्त्रे परत मागतात.

यांतील कोंकणी गवळण म्हणते, ''पावगा दातारा। पावगा दातारा। तूं नंदाचा झिलो। माकां फडको दी। मी हिवान मेलों। घे माझे कोयतो। देवा पाया पडलों।।''

या अभंगामध्ये नामदेवांनी तत्कालिन मराठी, कानडी, दखनी (मुसलमानी), कोंकणी व गुजराती भाषांचे नमुने सादर करून आपल्या विचक्षण बुद्धीचा प्रत्यय घडविला आहे. विशेष

म्हणजे, मराठी व कोंकणी भाषांचे स्वतंत्र नमुने देऊन त्या भिन्न भाषा होत्या या वस्तुस्थितीचा भक्कम पुरावा मागे ठेविला आहे. नामदेवाची कोंकणी गवळण ही कुडाळी बोलीत विनवणी करते. सात शतकांपूर्वी कोंकणी ही मराठीहून वेगळी होती इतकेच नव्हे, तर तिचे भिन्न विभेद देखील अस्तित्वात होते याचेच हे निदर्शक होय.

या अभंगात 'मुसलमानी' गवळणीचा उल्लेख आलेला आहे. यादवांच्या राजवटीत कोंकणामध्ये मुसलमानांची वस्ती होती काय? या प्रश्नाचे उत्तर होकारार्थी द्यावे लागेल. कोंकणामध्ये अरब व्यापाऱ्यांचा पायरव प्राचीन काळापासूनच होता. त्यांच्या तेथे वसाहतीही होत्या. गोमंतकातील कदंब राजवंशाचा संस्थापक गुहल्लदेव (द्वितीय) (इ.स.९80 ते 1005) हा सोमनाथाच्या तीर्थयात्रेस निघाला असताना जहाज नादुरुस्त झाल्याने 'गोपकपट्टण' (गोवे) बंदरात उतरला व तेथे मधुमोड (महमद) नावाच्या अरबी व्यापाऱ्याने त्याचा सन्मान केला, असे जयकेशिन (प्रथम) याच्या इ.स.1053 च्या ताम्रपटात नोंदले आहे. मधुमोडचा नातू सदन हा पुढे गोव्याचा कारभारी झाला व त्याने त्या शहराला इंद्रपुरीचे वैभव प्राप्त करून दिले. शिलाहार राजा चित्तराज याच्या इ.स. 1034 च्या संस्कृत ताम्रपटात अल्लिय, महर, मधुमत या अरब व्यापाऱ्यांची नावे आलेली आहेत. त्याकाळी 'संजाण' मंडल हे अरबी सुभेदारांच्या ताब्यात होते.

### संत नामदेवांच्या पंचगौळणी

गौळणी ठकविल्या। गौळणी ठकविल्या।
एक एक संगतीने। मराठी कानडीया।
एक मुसलमानी। कोंकणी गुजरणी।
अशा पांचीजणी। गौळणी ठकविल्या।।धृ।।
गौळणी सुंदरी। गौळणी सुंदरी।
गेल्या यमुनेतीरीं। वस्त्रे फेडुनियां स्नान करिती नारी।
गोविंदानें वस्त्रें। नेलीं कळंबावरी।
स्नान करोनियां। त्या आल्या बाहेरी ।।१।।

लडोबा गोविंदा। लडोबा गोविंदा।
निरवाणी आज। आडचाल्लो पडचाल्लो।
शिर फोड्या न कोडो। मारी कन्हय्या।
पानी खेळ्या न खेळो।।२।।

देखरे कन्हय्या देखरे कन्हय्या। मै इज्यतकी बडी।
कदम पकडूंगी। मैयां कुटोजुडी
मेरी चुनरी दे। मेरी ले दुल्लडी ।।३ ।।

देवकी नंदना। देवकी नंदना।
तूं एक श्रीपती। उघडी हिंवाची। तुज विनवुं किती।
पायां पडत्यें बा। मी येत्यें काकुळती।
माझी साडी दे। घे नाकाचें मोतीं ।।४ ।।

पावगा दातारा। पावगा दातारा। तूं नंदाचा झिलो।
माकां फडको दी। मी हिवान मेलों।
घे माझे कोयतो। देवा पायां पडलों ।।५ ।।

ज्योरे माधवजी ज्योरे माधवजी। मे शरण थई।
तनका काकैपी। बाप दयाळ तूंही।
मारी साडी अपो। हातणी ले कंकणी ।।६ ।।

इतुकें ऐकोनी। इतुकें ऐकोनी। देव बोले हांसोनी।
सूर्या दंडवत करा कर जोडोनी। नामा विनवतो।
म्हणे शारंगपाणी। गौळ्या ऐक तूं। धन्य तुझी करणी ।।७ ।।

*(श्री नामदेव गाथा, महाराष्ट्र शासन, अभंग 263 )*

इ.स.1367 च्या कोंकणाधिपती हंबीरराव याच्या नागाव शिलालेखात म्हैरू, हासण, माहामदु, दाडवार, हाजि या मुस्लिम व्यक्तींची नावे आली असून चिचावळी गावात मशीद उभारण्यासाठी दान दिल्याचा उल्लेख येतो. या अरबी - कोंकणी साहचर्यातूनच पुढे किनारपट्टीवरील दालदी, बाणकोटी, भटकळी या कोंकणी बोली उदय पावल्या.

नामदेव गाथ्यातील प्रस्तुत अभंगाच्या द्वारे कोंकणी भाषेच्या विकासाचा व विस्ताराचा एक टप्पा ज्ञात होत असला तरी हा आधार तितकासा भक्कम नव्हे. नामदेवांच्या अभंगांचे

चिकित्सापूर्ण संपादन अजून झालेले नाही. याशिवाय, प्रस्तुत अभंग गोंधळेकरांच्या गाथ्या म्हणजे पहिल्या मुद्रित नामदेव गाथ्यात (इ.स.1892) समाविष्ट झालेला नाही. तो सोळा शतकातील विष्णुदासानामा या कवीचा असण्याचाच जास्त संभव दिसतो.

16 फेब्रुवारी 1510 रोजी पोर्तुगीजांनी गोमंतकात पाय ठेवला; तो 19 डिसेंबर 1961 दिवस उजाडेपर्यंत काढला नाही. साडेचार शतकांच्या या प्रदीर्घ कालखंडात गोंयकारांनी प्रच उलथापालथ अनुभवली. जुने आचार, जुन्या परंपरा, जुने अनुबंध मोडीत निघाले. त्यांची जा यूरोपातून आयात केलेल्या नव्या आचारविचारांनी घेतली. धर्म बुडाला. धर्मग्रंथांची हो झाली. 1560 साली गोव्यात इन्क्विझिशनचे आगमन झाले. हिंदू धर्माचा पुरस्कार करणारा ग्र लिहिणे, वाचणे, जवळ बाळगणे यावर कडक बंदी आली. हा महाभयंकर गुन्हा करणाऱ्या 'आवतु द फॅ' नावाच्या उत्सवात जिवंत जाळण्याची शिक्षा मिळू लागली. ग्रंथांचे पेटारेच्य पेटारे जमा करून त्यांची 'व्हडल्या घरा' समोर राखरांगोळी होऊ लागली. यात संस्कृत ग्रंथ होते; मराठी ग्रंथ होते; कोंकणी ग्रंथही होते.

या अग्निप्रलयातून वाचलेला एकमेव गोमंतकी ग्रंथ म्हणजे कृष्णदासशाम्याच 'श्रीकृष्णचरित्रकथा' (भागवताच्या दशम स्कंधावरील टीका) हा होय. पोर्तुगीजांच्य आगमनकाली सुश्लिष्ट मराठी भाषेत साहित्यनिर्मिती करणारा एकमेव ज्ञात गोंयकार म्हणून कृष्णदासाशाम्याचा निर्देश करावा लागेल. इ.स.1526 मध्ये लिहिलेल्या या श्रीकृष्णचरित्रकथेची रोमन लिपीत लिहिलेली एक प्रत पोर्तुगालमधील ब्राग येथील ग्रंथालयात आहे. एक देवनागरी प्रत उज्जयिनीस, तर आणखी एक गोव्यात सापडली. गोव्यात सापडलेली प्रत बरीच अर्वाचीन असून तिच्या आधारे डॉ.प्रभुदेसाई व डॉ. मुंडी या पंडितद्वयाने या ग्रंथाचे ज्ञातृनिष्ठ पद्धतीने संपादन केले आहे. या काव्याच्या ब्राग व उज्जयिनी प्रतींचे सूक्ष्मावलोकन केले असतां असे दिसते, की मुळात हा ग्रंथ कोंकणी भाषेत लिहिलेला असावा व कालांतराने प्रतकारांनी त्याचे मराठीकरण केले असावे. पंडितद्वयांनी संपादित केलेल्या प्रतीतही कोंकणी वैशिष्ट्यांची रेलचेल आहे.

या काव्यातील तियेन, तुवें यांसारखी सर्वनामांची विभक्त्यन्त रूपे; माजरां, बाळकां, वुतरां, गुळे, टाळीं यांसारखी नामांची अनेकवचनी रूपे; करुनु, पेटुनि, (ठोकून), न्हेसले, देवलें इ. क्रियारूपे; फुडें, वैला, परीस यांसारखे परसर्ग; सटवा, इकरावा, पनरावा, तेगजण ई. संख्या व सोदि (शोध), कवाड (दार), वुजीवाडु (उजेड), काणी (कहाणी), हुमाणी (उखाणे),

पागार (दगडी कुंपण), खिणामाजी (क्षणात), तळतार (तळहातावर) इ. नामे व नामरूपे आजही कोंकणी भाषेत वापरली जातात.

अलीकडे या कृष्णदासशाम्याने लिहिलेले सातआठशे पानांचे गद्यरूप महाभारतही उपलब्ध झालेले आहे. कृष्णदासशाम्याने 'अश्वमेधु' नावाचे कोंकणी आख्यान लिहिल्याचे निर्देश आढळून येतात. कृष्णदासशाम्याच्या श्रीकृष्णचरित्राच्या धर्तीवर कोणा अज्ञात कवीने सोळाव्या शतकाच्या अन्त्य दशकात लिहिलेले 'वेंकटेश कल्याण' नावाचे खंडकाव्यही अलिकडे प्रसिद्ध झाले आहे. कोचीनकडील कोंकणी लोक त्याचे भक्तिभावाने पठण करीत.

जॉन लेडन आपल्या इ.स.1807 मध्ये लिहिलेल्या निबंधात सांगतो, की प्राचीन काळी कोंकणी ही एक साहित्यसंपन्न भाषा होती. भागवत, लिंगपुराण, रामायण आणि भारत यांसारख्या ग्रंथांचे अनुवाद; वीरभद्र-चरित्र, परशुराम-चरित्र यांसारख्या स्वतंत्र रचना; व आंग्रे-बखर, मालवणी बखर यांसारखे इतिहास कोंकणी भाषेत लिहिले गेले होते. दुर्दैवाने आज आपण या ग्रंथांस पारखे झालो आहोंत.

कोंकणीच्या बाल्यावस्थेतील अशा नाना लीळा इतिहासाच्या पडद्याआड गडप झाल्या आहेत. आज आपण एवढेच म्हणू शकतो, की पोर्तुगीजांचे आगमन होण्यापूर्वी किमान पाच शतके अगोदर कोंकणी भाषा अस्तित्वात होती. तिचा स्वत:चा असा घाट हाता, संरचना होती, शब्दभांडार होते. सामाजिक स्तरांशी समांतर अशा परा होत्या. दर बारा कोसांवर ती बदलत होती. असे असूनही तिचे नामविधान झाले नव्हते. तिला राजाश्रय नव्हता की धर्माश्रय नव्हता. कण्व ऋषींच्या आश्रमातील शकुंतलेप्रमाणे ती शुक्लेंदुवत् विकसत होती, विस्तारत होती. अन्य भाषिकांना ती मराठी भाषेचा एक प्रादेशिक भेद म्हणूनच ज्ञात होती. धर्मप्रसाराचे प्रभावी माध्यम म्हणून पोर्तुगीजांनी या लोकभाषेचा पुरस्कार केला. तिला साहित्यालंकृत केले. तिजविषयीची अस्मिता चेतविली.



प्रकरण सहावे

# ग्रांथिक कोंकणीचा उदय

लोकभाषा कोंकणीला ग्रंथभाषेचे वैभव प्राप्त करून देणारा आद्य ग्रंथकार फादर थॉमस स्टीफन्स (1549-1619) हा होय. फादर स्टीफन्सने आपले 'क्रिस्तपुराण' गोमंतकीय ब्राह्मणांच्या कोंकणी भाषेत लिहिले. स्टीफन्सच्या भाषेत ज्ञानदेवांचे 'देशी' वळण नव्हते, की चक्रधरांचे 'वऱ्हाडी' वळण नव्हते. ती गोमंतकाची विदग्ध 'कोंकणी' होती. ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, तुकाराम, रामदास, वामन पंडित, मोरोपंत इत्यादी ग्रंथकारांचे 'देशी' मराठीतील साहित्य वाचण्याची सवय असलेल्या राजवाड्यांना क्रिस्तपुराणाची भाषा 'कोंकणी पिशाची' वाटली; 'गावंढळ' वाटली. असे वाटणे स्वाभाविक होय. एका अर्थी ती खरोखरीच गावंढळ होती. तिच्या संस्कृतचे नागरी संस्कार झालेले नव्हते. गावागावात, रस्त्यारस्त्यावर, बाजारहाटात, चवाठ्यावर, पाणवठ्यावर, मंदिरात, गिरिजाघरात आणि माजघरात बोलली जाणारी ती गोमंतकाची निर्मळ, निरामय आणि निर्व्याज सरस्वती होती. हिलाच पुढे 'कोंकणी' हे सर्वमान्य अभिधान प्राप्त झाले. स्टीफन्सने आपल्या महाकाव्यात वाखाणलेली 'पुस्पामाजि पुस्पमोगरी की परिमळामाजि कस्तुरी' हीच होय.

ज्ञानेश्वर आपल्या भाषेला कधी प्राकृत तर कधी मऱ्हाटी असे संबोधितात. त्याचप्रमाणे स्टीफन्स आपल्या भाषेला कधी मराठी तर कधी स्थानिक ब्राह्मणांची भास असे संबोधितो. गोमंतकाचे पंतकवी पं.महेश्वरशास्त्री सुखठणकार (1719-1817) हे जयदेवाच्या गीतगोविंदाचा मराठी अनुवाद करतात. पण आपण कोंकणभाषेमध्ये लिहीत आहोंत असे ठासून सांगतात. आपल्या पुराणाच्या लेखनासाठी ही स्थानिक भाषा आपण का निवडली याचे स्पष्टीकरण स्टीफन्स प्रस्तावनेतच देतो.

“हेआ देसिंचेआं भासा भितुर ही भास परमेस्वराचेआ वस्तु निरोपुंसि योगे ऐसी दिसलि म्हणउनु पण सुध मराठी मधिमा लोकासि नकळे देखुनु हेआ पुराणाचा फळु बहुतां जनांसि सुफळु होउंसि काए केलें मागिलेआं कवेस्वरांचीं बहुतेकें अवघडें उत्तरें सांडुनु सांपुचेयां कवेस्वरांचिये रितु प्रमाणें आनियेकें सोंपीं ब्राह्मणांचे भासेचीं उत्तरें ठाईं ठाईं मिसरित करुनु कवित्व सोंपें केलें.”

ग्रंथ समाप्ती करताना स्टीफन्स लिहितो,

“जेसुची क्रुपा लाधली अंतस्करणीं।
तेणें सांतां प्रोफेतांची बोलणी।
आणी वांजेलिस्तीं चौगईंजणीं।
लिहिलें ग्रंथीं ।।
येतुकेयाचें ससार वेंचुनु।
काडिली टिका गांठुनु।
भासा मराठी मिसळुनु।
केला ग्रंथु ।।”




स्टीफन्स हा ग्रांथिक कोंकणीचा विश्वकर्मा होय. इंग्रजी-फ्रेंच भाषांना जसा लॅटिनचा आधार, हिंदी-मराठी-बंगाली भाषांना जसा संस्कृतचा आधार, तसा कोंकणी ग्रंथलेखनासाठी स्टीफन्सने मराठीचा आधार घेतला. त्याच्या या ‘ठाईं ठाईं मिसरित’ करण्याच्या प्रकारामुळे क्रिस्तपुराणाच्या भाषेला ‘घाट कोंकणी तर थाट मराठी’ असे संसृष्ट स्वरूप प्राप्त झाले आहे.

ज्ञानेश्वरीपेक्षाही विस्ताराने मोठे असे हे 10962 ओव्यांचे महाकाव्य इथूनतिथून भक्तिरसाने ओथंबलेले आहे. याचे ‘पैले पुराण’ आणि ‘दुसरे पुराण’ असे दोन भाग असून त्यांत अनुक्रमे बायबलचा जुना करार व नवा करार यांतील कथाभाग आलेला आहे. क्रिस्तपुराणाचे लेखन इ.स.1614 मध्ये पुरे झाले व त्याची पहिली आवृत्ती इ.स.1616 मध्ये गोव्यातील रायतूर येथील जेजुइतांच्या छापखान्यात मुद्रित झाली. मुद्रणाच्या सोयीसाठी ही रोमन लिपीत छापलेली असली तरी हिचे मूळ हस्तलिखित नागरी लिपीत लिहिलेले असावे असा एक तर्क आहे. क्रिस्तपुराणाची दुसरी आवृत्ती इ.स.1649 मध्ये आणि तिसरी आवृत्ती इ.स.1654 मध्ये निघाली. दुर्दैवाने या तीनही आवृत्यांची एकही प्रत आज जगात उपलब्ध नाही. इ.स.1907 मध्ये जोसेफ

सालढाणा यांनी संपादित केलेली चौथी आवृत्ती हस्तलिखित प्रतीवर आधारलेली होती. रोमन लिपीत आहे. हिचे शांताराम बंडेलू यांनी केलेले देवनागरी लिप्यंतरण 1956 सा पुण्याच्या प्रसाद प्रकाशनाने प्रसिद्ध केले.

बालकांना ख्रिस्ती धर्मतत्वांचे ज्ञान सुलभपणे व्हावे या हेतूने स्टीफन्सने गुरु-शि संवादाच्या स्वरूपाची एक पुस्तिका आपल्या पुराणाआधीच तयार केली होती. तिचे नाव 'दौत्रि क्रिश्तां' हे होय. ही दौत्रिन स्टीफन्सच्या पश्चात इ.स.1622 मध्ये प्रसिद्ध झाली. पाद्री मार्कु जॉर्जच्या पोर्तुगीज दौत्रिनीचा हा स्वैर अनुवाद होय. स्टीफन्सच्या या दौत्रिनीची भाषा कोंकणीच ब्राह्मणी बोली (Lingoa Bramana Canarim) ही होय. ठाईं ठाईं मराठी मिसरित करण्याच प्रकार हीमध्ये नाही.

स्टीफन्सच्या दौत्रिनी अगोदर, इ.स.1557 मध्ये मुद्रित झालेली सेंट झेवियरची कोंकणी दौत्रिन प्रचारात होती असे उल्लेख आढळतात; परंतु उपलब्ध दौत्रिनींमध्ये स्टीफन्सची दौत्रिन ही सर्वांत जुनी मुद्रित कोंकणी दौत्रिन होय. स्टीफन्सनंतर रिबैरु, माथिअस, जोसेफ, मिगेल, हॉस्टेन इ. पाद्रयांनी कोंकणी दौत्रिनी तयार केल्या. या सर्व दौत्रिनी सुबोध असल्या तरी, त्या अनुवादस्वरूप असून त्यात साहित्यगुणांचा अभावच होता. भाषिक अध्ययनाच्या दृष्टीकोनातून मात्र त्यांचे महत्व अनन्यसाधारण होय. कोंकणीच्या मध्ययुगीन संरचनेची, प्रभेदांची व विकासाची माहिती पुरविणारी तीं अस्सल साधने होत.

स्टीफन्स हा जन्माने इंग्रज असला तरी प्रवृत्तीने पुरता गोंयकार होऊन गेला होता. जन्माने फ्रेंच असलेला, परंतु स्टीफन्सच्याच तोडीचा कोंकणी महाकवी पाद्री एतियेन-द-ला-क्रुवा (1579-1643) हा होय. स्टीफन्सने 'क्रिस्तपुराण' लिहिले; तर क्रुवाने 'पीटरपुराण' लिहिले. क्रिस्तपुराणाची रचना 'परम शास्त्र जगीं प्रघटावेया, बहुतां जनां फळसिधी होवावेया'' या उद्देशाने झाली. पीटरपुराणाचे प्रधान प्रयोजन ''कुड्यां कोंकण्यांच्या देवांचे भजनाचे विविध परि छेदन'' हे होय. सुमारे 12000 ओव्यांच्या या ग्रंथात हिंदूंच्या विष्णू, राम, महेश, गणेश, तुलसी इ. देव-देवतांचा यथेच्छ समाचार घेतला आहे.

क्रुवाने कोंकणी भाषेवर चांगलेच प्रभुत्व मिळविले होते. आलेक्स-द-ऱ्होड्स या समकालीन फ्रेंच प्रवाश्याने क्रुवाच्या या भाषाप्रभुत्वाची खूपच तारीफ केली आहे. तो म्हणतो, ''सर्व हिंदुस्तानामध्ये तो (क्रुवा) अत्यंत थोर पुरुष गणला जातो. त्या भागातील ज्या दोन

प्रचलित भाषा, म्हणजे सर्वसाधारण लोकांमध्ये चालणारी कानारीं (कोंकणी) व आम्हांला ज्याप्रमाणे लॅटिन त्याप्रमाणे त्यांना असलेली मरास्ट (मराठी) या तिकडील रहिवाश्यांपेक्षाही त्याला चांगल्या बोलता येतात, आणि या भाषांमध्ये त्याने काही पुस्तके छापलेली असून त्यांची फार वाखाणणी होत आहे.मी त्याचे क्रिस्तासंबंधी एक सुंदर करुणागीत पाहिले आहे की, जे कारीमच्या (ईस्टरपूर्वीचे उपवासाचे दिवस) दिवसांत क्रिस्ती लोक दर रविवारी गात. हे भजन रात्रभर चाले आणि त्याला इतकी गर्दी लोटे की, केवळ गोव्यामधूनच सुमारे दहा ते बारा हजार लोक हा सुंदर सोहळा पाहण्यास गोळा होत!''

पीटरपुराणाचे मुद्रण 1629 साली झाले; परंतु प्रसिद्धीचा परवाना मात्र 1634 साली मिळालेला दिसतो. या काव्याची भाषा क्रिस्तपुराणाप्रमाणे 'ग्रांथिक कोंकणी' असून मराठीचा तिच्यावर खूप प्रभाव आहे. साहित्यगुणांच्या बाबतीत मात्र ते अगदीच थिटे आहे. क्रुवाच्या भाषेत तत्कालिन कोंकणीची अनेक वैशिष्ट्ये आढळून येतात. 'तो' 'जो' या सर्वनामांसाठी क्रुवा 'ता' 'जा' ही सर्वनामे योजतो. नामांची तृतीयान्त रूपे 'मातेन' 'पेद्रुन', 'जेजुन' अशी करतो. द्वित्त व्यंजने एकेरी करणे, महाप्राण ध्वनी अल्पप्राण करणे, तालव्य संघर्षीऐवजी दंत्यसंघर्षी वापरणे इ. वैशिष्ट्ये सर्वत्र आढळतात. या पुराणातील कुपें (ढग), पाथरी (दगड), निवेद (नैवेद्य), कामती (शेतकरी), उजुवांडु (उजेड), बास्तरि (बहात्तर), ग्रेस्तपण (श्रीमंती), गुन्यावकार (गुन्हेगार) इ. शेकडो शब्द आजही कोंकणीमध्ये प्रचारात आहेत.

''ठांई ठांईं आघवे ग्रंथीं विविध फे भावार्थाचे पार अर्थिले हाति, आणी विविध उपमा दिधलिया हाति. पण शेब्दा अखेरां, आणी वोवियांचेआ घडिता ठाईं जी चुकि, भेदु पडला असेल, इतुकेआचा अपराधु मज परदेसिया फ्रिंगियासि तुमि खेमा करावा लागे. आणि नगमतेआ ठसणारें ग्रंथु ठसिला देखोनि उणें पुरें ठाईं ठाईं जें चुकिर पडलें असे, तेआचें जें कांहीं सरसाविलें नाहीं, तें तुमी ग्रंथ वाचप करितां विवेखीं सरसावें, म्हणिपे न फावे तेआं अखेरें, अथवा शेब्दें जें कांहीं अरुतें परुतें, उणें पुरें चुकोनि ठसविले आहे, तें चुकिर ऐसें नवाचितां पण चुकललीं अखेरें, अथवा शेब्द विवेखमुखीं काडोनि, अथवा चडउनि फावे ते प्रकारीं सुध सुपस्ट वाचिजे.''

**– पाद्री एतियेन द ला क्रुवा कृत**
**पीटर पुराण (1629) या ग्रंथाच्या प्रस्तावनेतून**

पाद्री आंतोनियु-द-सालदांज (1599-1663) हा, कोंकणी भाषेतील आद्य संतचरित्रकार होय. याचा बाप पोर्तुगीज तर आई इटालियन; जन्मभूमी आफ्रिका तर कर्मभूमी गोमंतक. याने 'सांतु आंतोनिचीं अचर्या'(1651) या नावाचा गद्य ग्रंथ कोंकणीच्या कुणबी बोलीत (Lingua de terra corrente) लिहिला आहे. या ग्रंथाच्या पहिल्या भागात पादुवा (पोर्तुगाल) येथील संत आंतोनी याचे चरित्र आले असून, तो जिवंत असताना घडलेल्या तीस चमत्कारांचे त्यात वर्णन केले आहे. दुसऱ्या भागात आंतोनीच्या निधनानंतर घडलेल्या तेवीस चमत्कारांच्या कथा आलेल्या आहेत. सालदांजने याच कथांवर आधारलेले, 'सांतु आंतोनिची जीवित्वकथा' (1655) या शीर्षकाचे 539 ओव्यांचे काव्यही लिहिले आहे. हे कोंकणीच्या ब्राह्मणी बोलीत आहे. प्रा.अ.का.प्रियोळकर या ग्रंथाला सतराव्या शतकांतील क्रिस्ती भक्तविजय असे म्हणतात. सालदांजने 'जीवितवृक्षाची फळे' या नावाचा ग्रंथ असाच कोंकणी गद्यात व पद्यात लिहिला आहे. याची आणखीही काही ग्रंथरचना होती; परंतु ती आज उपलब्ध नाही.

सतराव्या शतकातील कोंकणी ग्रंथकारांत मिगेल-द-आल्मैद (1607-1683) हा पाद्री आपल्या 'वनवाळ्यांचॉ मळॉ' या ग्रंथामुळे प्रसिद्धीस पावला. 557 पृष्ठांचा हा ग्रंथ गोव्यातील सेंट पॉल कॉलेजच्या मुद्रणालयात इ.स.1658 मध्ये रोमन लिपीत छापला गेला. हा कोंकणीच्या ब्राह्मणी बोलीत लिहिलेला असून त्याचे एकूण पाच खंड आहेत. यापैकी तिसरा व पाचवा असे दोनच खंड आज उपलब्ध आहेत.

---

## सुरावली आणि धोंकुली गावांची व्युत्पत्ती

*"सुरावलेकारांनो तुमंच्या गांवाक हें सुराउली नांव खंइ ठावूनु आइलें ? ताची कोणि विभगि, वा कोणु अर्थु तुमीं जाणतलेति ? पुराणिक म्हणताति, की ह्या गांवाक तिनि नांवा आसति: पइलें सुरी आइली, म्हणजे ह्या गांवाक येकि सुरी, अथवा पिस्काती आइली. दुसरें नांव सुरियु आइली, आधिले म्हणताति कोणे प्रमाणि ह्या तुमंच्या गांवांतु सुरियाची माए आइली : देखुनु ह्या गांवाक सुराउली म्होणु नांवाडिताति, सुरियाचे मायेचो गांवृसो उचारिताति. तिसरें नांव जे मरास्टे भासेन आस, तें हें सुरु आइलो, सुरु आइलें; सुरु आइले : म्हणजे स्वर्गिचो लोकु: येणे करितां सुराउली जी आस, ती स्वर्गी ठावूनु आइलली येकि स्त्री."*

*“आतां धोंकुली गांवाची कोणि तुस्ति करूं ? धोंकुली नांव जें आस, तें दों उतरांचें मांडता, येक उत्तर फिरींगे भासेचें, हेर कोंकणिये भासेचें : फिरिंगें जें आस, तें दों, कोंकणे जें आस, तें कुळी. फिरिंगे उत्तर दों, थोरिव, प्राप्ति महिमा अर्थता, जेणेप्रमाणीं दों जुवांव, दों फ्रांसिस्कु, दों दियोगु. कोंकणे उतर कुळी, आपुलिए कुळियेचें तेज दाखवून दिता: येणे कर्ता दोंकुळी नांव जें आस, तें कुळिये पदविये थोरिवे, प्राप्ती म्हइमेचें किर्तिवंत नांव.”*

**–पाद्री मिगेल–द–आल्मैद कृत वनवाळ्यांचॉ मळॉ**

*3 : 151 - 152 (इ. स. 1658)*

---

प्रवचनात्मक स्वरूपाच्या या ग्रंथात ख्रिस्ती धर्मतत्वांबरोबरच येशू, मेरी, पीटर, अँथनी इ. विभूतींच्या कथाही आल्या आहेत. आल्मैदच्या लिखाणात कोंकणी भाषेचा अधिकृत निर्देश प्रथमच आढळतो. “धोंकुली नांव जें आस, तें दों उतरांचें मांडता, येक उतर फिरींगे भासेचें, हेर कोंकणिये भासेचें”

आल्मैदप्रमाणेच कोंकणीवर प्रभुत्व असलेला दुसरा पोर्तुगीज ग्रंथकार, पाद्री दियोगु रिबैरु (1560–1633) हा होय. याने ‘क्रिस्तांवाचे दौक्त्रिनीचो अर्थु’ या नावाची 215 पृष्ठांची दौत्रिन 1622 साली प्रसिद्ध केली. स्टीफन्सची दौत्रिन ही पोर्तुगाल–परंपरेवर आधारलेली असून ती पाद्री मार्कुश जॉर्ज याच्या पोर्तुगीज दौत्रिनीचा अनुवाद होय. रिबैरुची दौत्रिन रोम–परंपरेवर आधारलेली असून ती पाद्री रॉबर्ट बॅलार्मिनच्या लॅटिन दौत्रिनीचा स्वैर कोंकणी अनुवाद होय. कोंकणी व्याकरण व शब्दकोश यांविषयीचीही यास चांगली जाण होती.

रिबैरु हा शब्दप्रभू होता. जन्माने पोर्तुगीज असला तरी त्याच्या भाषेला गोमंतकाच्या मातीचा वास येतो. कोंकणी भाषेचा अस्सल गोडवा त्याच्या कल्पनावैभवातून आणि आलंकारिक भाषाशैलीतून प्रतीत होतो. उदा. “जेणे प्रमाणीं येक घर बांदुचे जाल्यारि, पय्ली बुन्यादि (पाया) घेउंची, मागिरी वोणती (भिंती) उभारुंच्यो, सेवटी सिंवचे (शिवायचे), पण हें इतुक करुंच्याक कारगिरायकाची कांइ येकां आयदानां (हत्यारे) जांइ, तेणेचि प्रमाणीं आमंच्यां आत्म्यांतु सगुणाचें घर बांदुंच्याक भावार्थु जाओ, तो बुन्यादि म्होणु. भर्वसो जाओ, तो वोणती, करिदादि जाइ ती सेज म्होणु. आयदन्नाई जांइ, तीं म्हणजे सांत साक्रामेंत.”

सतराव्या शतकात नाना पंथांचे ख्रिस्ती धर्मोपदेशक वसईपासून मलबारपर्यंतच्या किन प्रदेशात कार्यमग्न होते. त्यांतील जेजुइत, फ्रांसिस्कन, ऑगस्तिनियन, दोमिनिकन, कार्मेलिन पंथ प्रमुख होत. कोंकणीच्या विकासात जेजुइतांचा सिंहाचा वाटा आहे. फ्रांसिस्कनांचा थोडाबहुत हातभार लागलेला दिसतो. यांतील फ्रै गास्पार द मिगेल या फ्रांसिस्कन पाद्याने बरे लेखन केलेले आहे. याने 3000 ओव्यांचे 'ख्रिस्ताचे यातनागीत' व 6000 ओव्यांचा 'विवेकमळ अशांसारखी अनेक काव्ये कोंकणी भाषेत लिहिली आहेत. कोंकणी भाषेचे एक व्याकरण लिहिले आहे. कोंकणीचा एक कोशही बनविला आहे. याने रचलेले फादर स्टीफन्सची स्तुत करणारे एक गीतही उपलब्ध आहे.

मिशनऱ्यांच्या या सर्व साहित्यामागे धर्मप्रसाराची प्रेरणा होती. यासाठी त्यांना स्थानिक कोंकणी भाषेचा आश्रय घेणे क्रमप्राप्त झाले. त्यांनी कोंकणी भाषेचा अभ्यास केला व ती भाषा आत्मसात केली. संस्कृत व मराठी भाषांतील धार्मिक साहित्याचे आलोडन केले. नवख्रिस्त्यांचा पूर्वधर्माकडील ओढा नाहीसा व्हावा म्हणून ग्रंथसंहार केला. या ग्रंथसंहारात अनेक कोंकणी ग्रंथांचीही होळी झाली. त्यातून वाचलेले गोमंतकीय कवी ज्ञानदेव याचे 'द्रोणपर्व' आणि 'योगवासिष्ठ' हे दोन ग्रंथ अलिकडेच उपलब्ध झालेले आहेत. स्टीफन्सने या ग्रंथांचा चांगलाच अभ्यास केला असावा, हे त्याच्या व ज्ञानदेवाच्या काव्यांतील कल्पना, शब्दरचना व निरुपणशैलीतील साधर्म्यावरून स्पष्ट होते. स्टीफन्सने क्रिस्तपुराणाच्या प्रस्तावनेत उल्लेखिलेले 'मागिले कवेस्वर' हे मराठी कवी व 'सांपुचे कवेस्वर' हे कोंकणी कवी होत, हे उघड होय. ज्ञानदेवाच्या रचनेवर मराठीचा प्रभाव असणे हे स्वाभाविक होय. तरीही त्याची कोंकणी भाषा लपून रहात नाही. उदा.

सर्व पातकांचा खता। एकलक्षें आइकतां।
फिटती जन्मांतिंचीं दुरितां। चतुर्भुज होती ।।28।।

राया तुझें मुख पाहातां। मसीचा कुंचा ऐसे दिसता।
काय मनीं वर्तता। ते मज सांगे पां ।।71।।

स्वामि इतका दळभारू असतां। काय मजवरी पडता।
परयुद्ध देखोनिया आस्था। मनिं माजे ।।119।।

द्रोणपर्वातील या ओव्यांत 'दुरितां' हे अनेकवचनी नामरूप आणि 'दिसता', 'वर्तता' ही क्रियारूपे अस्सल कोंकणी होत. अशी शेकडो शब्दरूपे या काव्यात आढळतात. स्टीफन्स हा कोंकणीचा आद्य महाकवी असला तरी त्याने दूरान्वयाने आपल्या पूर्वसूरींचे ऋण मान्य केलेले आहे. नवख्रिस्त्यांमधील 'जे कवण येकादे वेळां पुर्विलेआ कवित्वांचा सुंगारु वा बरवी मास अद्यापीं आठवताती ते हें कवित्व वाचुनु संतोसु मानिती आणी फावे तो फळु भोगिती' असे तो म्हणतो. स्टीफन्सने ग्रांथिक कोंकणीचा पाया घातला; परंतु त्यासाठी वापरलेले 'फातर' मात्र ज्ञानदेवादी पूर्वकवींच्या काव्यातून गोळा केले.

धर्मांतरितांना ख्रिस्ती धर्मतत्वांचे आकलन व्हावे; नित्य व नैमित्तिक आन्हिकांची आचारसंहिता उपलब्ध व्हावी; हिंदूंची धर्मतत्वे व त्यांच्या देवदेवता यांची खिल्ली उडवून नवख्रिस्त्यांचा पूर्वधर्माकडील ओढा नाहीसा व्हावा इत्यादि उद्देशांनी हे सर्व साहित्य निर्माण झाले. परंतु, त्यामधून कोंकणीची कूस उजवी असून ती एक सक्षम, समर्थ आणि संपन्न भाषा आहे हे सत्य सिद्ध झाले. नवनवीन आचार, विचार, संस्कृती आणि सभ्यता यांचा ओघ एतद्देशीयांकडे वळविताना या ग्रंथकारांना पोर्तुगीज भाषेचा आश्रय ठायीठायी घ्यावा लागला. परिणामत: हजारो पोर्तुगीज शब्दांनी कोंकणीच्या शब्दसंग्रहात ठाण मांडले. कोंकणी भाषेला नवीन शब्दकळा प्राप्त झाली.

जेव्हा महाराष्ट्रात मुद्रण ही काय चीज आहे यासंबंधी संपूर्ण अज्ञान होते; तेव्हा एका पाठोपाठ एक कोंकणी ग्रंथ छापखान्यातून बाहेर पडत होते. त्यांच्या आवृत्त्यांवर आवृत्त्या निघत होत्या. त्यांचे वैयक्तिक व सामुदायिक वाचन होत होते. त्यांवर प्रवचने होत होती. ती श्रवण करण्यासाठी शेकडो लोक गर्दी करीत होते. प्रश्न विचारीत होते. आपल्या शंकांचे निरसन करून घेत होते. आपल्या ज्ञानाच्या कक्षा विस्तारीत होते. या लेखन-वाचन-प्रवचनाच्या प्रक्रियेतून कोंकणी भाषेचे स्थिरीकरण झाले. तिच्या प्रमाणीकरणाचा पाया घातला गेला. तिला नववैभव प्राप्त झाले. शतकानुशतके लोकभाषा म्हणून रुढ असलेली कोंकणी एक ग्रंथभाषा म्हणून डौलाने पुढे सरसावली.

■□■□

प्रकरण सातवे

# कोंकणीचा ख्रिस्ती अवतार

पोर्तुगीजांच्या आत्यंतिक धार्मिक जुलमामुळे गोव्यातील कोंकणी प्रजेची एक हिंदू जग आणि दुसरे ख्रिस्ती जग अशी उभी फाळणी झाली. हे दोन जनसमुदाय दोन भिन्न दिशांनी वाहत राहिले. हिंदू आपल्या पारंपारिक आचारविचारांना अधिक घट्टपणे चिकटले. दक्षिणेकडे कानडी संस्कृतीशी आणि उत्तरेकडे मराठी संस्कृतीशी त्यांचे संबंध अधिक दृढ झाले. यामुळेच दक्षिण कोंकणीवर कन्नड-तुळूचा आणि उत्तर कोंकणीवर मराठीचा प्रभाव वाढीस लागला. नवख्रिस्त्यांची परिस्थिती मात्र पोरक्या पोरासारखी झाली. मूळ परंपरेची नाळ तुटल्याने नव्या परंपरेला जवळ करण्याशिवाय त्यांस गत्यंतरच उरले नव्हते. त्यांनी तेच केले. पोर्तुगीजांचे मुक्तपणे अनुकरण केले. जीवनाला नवे वळण दिले. युरोपातील आचार, विचार, ज्ञान, विज्ञान यांस आपलेसे केले.

भाषा ही दर्पणाप्रमाणे परावर्तक असते. जीवनाचे तंतोतंत प्रतिबिंब तिच्यामध्ये साकार होत असते. नव्या जीवनपद्धतीला अनुसरुन नवख्रिस्त्यांनी आपल्या भाषेलाही साहेबी वळण दिले. शेकडो नवनवीन संकल्पना कोंकणीमध्ये रुजविल्या. हजारो पोर्तुगीज शब्द, म्हणी व वाक्प्रचार कोंकणीमध्ये घुसविले. रोमन लिपीच्या अंगिकाराने आपले वेगळेपण जोपासले. या परपुष्टतेमधूनच कोंकणीची ख्रिस्ती बोली उदयास आली. पुढे तिचे प्रादेशिक प्रभेदही निर्माण झाले. धार्मिक, सामाजिक आणि राजकीय परिवर्तनाशी अनुरुप असा नवा अवतार तिने धारण केला.

मंदिरे आणि मठांची जागा इगर्ज (चर्च) आणि कपेलांनी (चॅपेल) घेतली. राम, कृष्ण, हनुमान, गणेश, लक्ष्मी, सरस्वती, इत्यादींच्या जागी आदांव, इव, जेसु, मरी, योसे, सांता,

सफन्या, जखऱ्या, ओबद्या, यशया, हाग्गय, मत्तय, इसा, मोइसे, माथ्युस, करिंथकर, गलतीकर अशी मंडळी आली. धर्मांतरितांसाठी वा नवजात शिशूंसाठी याच नामभांडाराचा उपयोग होऊ लागला. काशी, रामेश्वर, गया, वृंदावन या क्षेत्रांपलिकडे भूगोलाची व्याप्ती असू शकते अशी वदंता नसलेल्या कानांना मिसर, खानां, गाझा, गालिलेया, थार्सि, नजरे, मांब्रे, गोरिया, साबा, सिनाइ अशी चमत्कारिक नावे ऐकण्याची सवय झाली.

सोळा संस्कारांची उधळपट्टी जाऊन त्यांची जागी बाव्तीझ्म (धर्मदीक्षा), क्रीझ्म (थिरावणी), कोमुन्यांव (प्रभुभोजन), कुमसार (पापाचा झाडा), काझार (विवाह), ओर्देनासाव (अधिकार-प्रदान), सोंतेसांव (तेललावणी) असे सुटसुटीत सात साक्रामेंत आले.

दसरा, दिवाळी, गणपती, पोळा इ. सणांवर संक्रांत येऊन त्यांना पास्कां (ईस्टर), नातलां (नाताळ), फेस्त (जत्रा) यांनी बाहेर काढले. शिमग्याची जागा इंत्रूजने (कार्निवल) घेतली आणि शंकासुराच्या सोंगाची कसर राजा मोमो भरून काढू लागला. रामनवमी नाहिशी झाली; पण रामाचो आयतार (पाम संडे) दाखल झाला. भरीस भर म्हणून शुभ सुक्रार, पवित्र शेनवार, गोबराचो बुधवार हजेरी लावू लागले.

पुरोहिताच्या जागी पाद्री आला. गुरवाऐवजी साकिस्तांव घंटानाद करू लागला. पूजेअर्चेपेक्षा प्रार्थनेलाच महत्व चढले. घरोघर सकाळ, दुपार, सायंकाळ आव्हे मारीयचे स्तोत्रपठण होऊ लागले. चर्चमध्ये रोज धाकले मीस व फेस्ताच्या वेळी व्हडले मीस या प्रार्थना होऊ लागल्या. मयतासमोर पाद्रीबुवाचे ओरासांव नावाचे प्रवचन होऊन तेर्स नावाची प्रार्थना होऊ लागली. इतक्या प्रार्थना कमी पडतील म्हणून की काय ग्लोरिया, रोझरी, लादीन अशांसारख्या आणखीही काही प्रार्थना होऊ लागल्या.

महाराची जागा पॅदॉने घेतली. तो घंटा बडवीत मृताची खबर देण्यासाठी गावभर फिरू लागला. न्हाव्याचा बार्बेर झाला; तर गवंड्याचा पेंद्रेर झाला. पाथरवटाचा कोंकेर, सुताराचा मेस्त व भंडाऱ्याचा रेंदेर झाला. पोदेर हा गावभर उंडे (पाव) आणि कांकणां (चकल्या)* विकीत हिंडू लागला. गावोगावचे वैज हे दोतोर बनले. सर्व हिंदूंची गणना जेंतियुश किंवा पगाण म्हणून होऊ लागली.

** टीप : मैदाच्या पिठाचा रुचीने पावासारखाच, चंक्रीय-आकाराचा चहात बुडवून खाण्याचा पदार्थ*

भोजनामध्ये पंचपक्वान्नांपेक्षा मसालेदार पदार्थांचा वरचष्मा वाढला. शीतकढीऐवजी आर्रोज नावाचा मसालेभात रुचकर वाटू लागला. पक्वान्नांची जागा दोस घेऊन बसले. माशांच्या कढीऐवजी गोमांसाचे आसाद आणि आंबटतीख घरोघर खदखदू लागले. आंबालिंबू यांच्या लोणच्यांची जागा बाल्शांव या कोलंबीच्या लोणच्याने घेतली. नेवऱ्यांपेक्षा बेबींक गोड वाटू लागले. पुरणपोळीपेक्षा केकची मिजास वाढली. काळा साहेब टेबलासमोर बसून काट्याचमच्याने जेऊ लागला. सोरो पिणे ही नित्याची बाब झाली. वधुवरांचे शुभचिंतन लिक्युरच्या घोटाने होऊ लागले. झेलाचे (बर्फ) खडे घातलेल्या व्हिस्कीने जीवनाला मादकपणा आला. चावडीवरच्या बैठकी आता टॅव्हर्नात (गुत्ता) भरू लागल्या.

घरे प्रशस्त आणि रुबाबदार झाली. घराच्या सालांची (खोल्या)* संख्या वाढली. प्रवेशद्वारांपाशी ओसरीऐवजी बल्कांव आले. ओटीची बैठक साल-द-व्हिजित झाली. धुरकट आणि अंधाऱ्या स्वयंपाकघराचे रुपांतर ऐसपैस कुझीनमध्ये झाले. भिंतींना झरोक्याऐवजी जोनेल (खिडक्या) लागल्या आणि कोनाड्यांच्या जागी आालमार जाऊन बसल्या. दिवाणखान्याच्या कोपऱ्यात सेक्रेतारीय नावाचे मोठे मेज आले. त्यासमोर कदेलावर (खुर्ची) बसून काळा साहेब कधीमधी लेखन करू लागला. त्याला एंप्रेगाद म्हणवून घ्यायला आवडू लागले.

देवपूजेचा देव्हारा जाऊन त्याजागी ओरोतोर नावाचे देवघर आले. त्यात जेजूला जवळ घेतलेली मारिया जाऊन बसली. अंगणात तुळशी वृंदावनाच्या जागी क्रुझ उभारला गेला. जपमाळेची रोझरी झाली. तिला एकशे आठ ऐवजी एकशे पासष्ट मणी लागू लागले. सकाळी आणि सायंकाळी मीस किंवा लादीन नावाच्या भजनाद्वारे 'येमखोंडातल्या उज्यांतले' निवारण करून 'सोर्गार व्होर' म्हणून जेजू आणि मरीची याचना होऊ लागली.

अधूनमधून दिवाणखान्यात दांस (नाच) होऊ लागला. गिटाराच्या साथीवर सेरेनात किंवा फादू या गीतांचे गायन होऊ लागले. लग्नात किंवा फेस्ताच्या वेळेला सुवारो नावाचा दांस होऊ लागला. तो कमी पडतो म्हणून की काय तब्बल पाच दिवस मेझार नावाचा थट्टामस्करीचा धिंगाणा सुरु झाला.

पेहरावात प्रचंड परिवर्तन झाले. पंचा, धोतर, अंगरखा, उपरणे जाऊन त्यांची जागा सूट, बूट, जाकीट, टाय, हॅट यांनी घेतली. अंगरख्याला बोल्स (खिसे) आले. त्यामध्ये घड्याळ

*टीप : * 'साल' ह्या पोर्तुगीज शब्दाचा अर्थ इंग्रजीत 'हॉल' (Hall) असा होतो.*

ाऊन बसले. घड्याळाची ग्रिल्यांव (साखळी) दिमाखाने बाहेर लोंबू लागली. मिसाला, लग्नाला, स्ताला, अंत्ययात्रेला जाताना काळा सूट लागू लागला. घरात वावरताना पिजामा आणि पाता आवश्यक झाल्या. कालसोरियु नावाच्या काळ्या कायद्याने पुरुषांवर इजारी घालण्याची स्त्रियांवर चोळी घालण्याची सक्ती करण्यात आली.

इन्क्विझिशनच्या नियमाप्रमाणे नऊवारी साडीस रजा मिळाली. तिच्या जागी पाचवारी ाडी पानपालो किंवा पानबाजू पद्धतीने गुंडाळली जाऊ लागली. साडीशिवाय, व्हेस्तिदु (फ्रॉक) ापरण्यास प्रारंभ झाला. चर्चमध्ये जाताना लेंसॉल किंवा ओल नावाची ओढणी आवश्यक झाली. अंगात किमांव नावाची लांब चोळी आली. कूंकू पुसले गेले; पण पावडर, स्नो, रुज, लिपस्टीकची गरज वाढली. आकडे, पिना, दातोणी लावून केस बंदिस्त होऊ लागले. आंबाड्यावर कडकडे फूल, पिसोळ्या, कुडतरे विराजमान होऊ लागली. कानात पेनेती, काराबां नावाची कर्णभूषणे लटकू लागली. नाकातील नथी, मुदी, चमक्या नाहीशा झाल्या. गळ्यात कोर्दांव, सरपळी, फुगादोर, फातर इ. अलंकार शोभू लागले. साडीला ब्रुश किंवा आल्फितेन नावाची पीन आवश्यक झाली. लग्नाची अंगठी आयुष्यभर सोबत करू लागली.

धर्म बदलला, जाती नाहीशा झाल्या. परंतु वर्णव्यवस्था अवशिष्टच राहिली. हिंदू स्त्रीपासून मुस्लिम पुरुषास झालेली प्रजा नायटे म्हणून ओळखली जाऊ लागली. मुस्लिम स्त्रीपासून पोर्तुगीज पुरुषास झालेली प्रजा मेस्तीस बनली. पूर्वधर्मातील सारस्वतादी सुविद्य मंडळी बामुण झाली. कऱ्हाडे, पदे, कुणबी, किरवंत, वाणी, नाईक इ. हरकामे लोक चारडे किंवा चाड्डे (शारॉदॉ) झाले. गावडे, खारवी, कोळी, भंडारी इ. मंडळींची गणना सुदिर (शूद्र) म्हणून होऊ लागली. कोणत्या जातीची गणना कोणत्या वर्णात होऊ लागली हा काहीसा मतभेदाचा विषय असला तरी पूर्वीची जातिभेदाची तीव्रता नाहीशी होऊन सर्व धर्मांतरित मंडळी ख्रिस्ती म्हणून एकोप्याने नांदू लागली हे सत्य होय.

पिढ्यांमागून पिढ्या लोटल्या. हिंदू, ख्रिस्ती, मुस्लिम यांच्यामधील धार्मिक तेढ निवळली. परस्पर व्यवहार वाढीस लागला. आपली सांस्कृतिक नाळ एकच आहे याची जाणीव झाली. सारेजण गोंयकार म्हणवून घेण्यात भूषण मानू लागले. आपले पारंपारिक मतभेद विसरून कोंकणीच्या झेंड्याखाली एकदिलाने उभे राहिले.





प्रकरण आठवे

# कोंकणीचे भाषिक अभ्यास आणि वादविवाद

अर्वाचीन भारतीय भाषांत शास्त्रीय व्याकरणाने सालंकृत होण्याचा आद्य मान कोंकणीकडे जातो. याचे श्रेय ग्रांथिक कोंकणीचा पाया घालणाऱ्या फादर स्टीफन्सला द्यावे लागेल. त्याच्या व्याकरणाचे नाव 'आर्ति-द-लिंग्वा कानारी' म्हणजे 'कानारी (कोंकणी) भाषेचे व्याकरण' असे असून ते पोर्तुगीज भाषेत लिहिलेले आहे. या व्याकरणाचे लेखन स्टीफन्सच्या मृत्यूपूर्वी म्हणजे इ.स.1619 पूर्वी केव्हा तरी झाले असले तरी, त्याची पहिली आवृत्ती इ.स.1640 मध्ये रायतूर येथील सेंट इग्नेशस कॉलेजमधून प्रसिद्ध झाली. दुसरी आवृत्ती 1857 साली तत्कालीन गोवा शासनाचे मुख्य सचिव कुंज रिव्हार यांनी प्रसिद्ध केली. या व्याकरणामधून स्टीफन्सच्या सूक्ष्म निरीक्षणशक्तीचे दर्शन तर घडतेच; परंतु शिवाय त्याच्या कोंकणी भाषेवरील प्रभुत्वाचीही ग्वाही मिळते.

स्टीफन्सपूर्वीही कोंकणी भाषेची व्याकरणे लिहिली गेली होती; परंतु ती आज उपलब्ध नाहीत. अशा भ्रूणावस्थेतील एका व्याकरणाचा निर्देश पाद्री लोव्हेंस पॅरिश याच्या 17 डिसेंबर 1563 च्या पत्रामध्ये आढळून येतो. या पत्रात 'एक एतद्देशीय भाई स्वत: तयार केलेल्या कानारी भाषेच्या व्याकरणाच्या आधारे विद्यार्थ्यांना कानारी भाषा शिकवतो' असे पॅरिशने लिहिले आहे. या गोंयकार पाद्र्याचे नाव आंद्रे वाझ असे होते.

स्टीफन्सचे वर उल्लेखिलेले व्याकरण प्रसिद्ध होण्यापूर्वी त्यावर पाद्री दियोगु रिबैरु याचा हात फिरला होता. रिबैरुने स्वत: देखील सासष्टीमधील अन्य पाद्र्यांच्या सहकार्याने एक कानारी-पोर्तुगीज कोश बनविला होता. या कोशाचे इ. स. 1626 चे हस्तलिखित गोव्यातील शासकीय ग्रंथालयात ठेवलेले असून त्यात सुमारे चौदा हजार कोंकणी शब्द संग्रहित केलेले आढळतात.

**आर्ति – द – लिंग्व कानारीं**
**फादर स्टीफन्स कृत कोंकणी भाषेचे**
**पहिले व्याकरण इ. स. 1640**


IESVS MARIA
ARTE DA
LINGOA CANA
RIM
COMPOSTA PELO PADRE
Thomaz estevaõ da Companhia d
IESVS & acrecentada pello Padr
Diogo Ribeiro da mesma Cõpanhia
E nouemente reuista, & emendada por
outros quatro Padres da mesma Com
panhia.

IHS

Com Licença da S. Inquisicam & Or
dinario
em Rachol no Collegio de S. Ignacio
da Companhia de IESV. Anno de
1640.

कोंकणीचा पहिला एकभाषिक शब्दकोश चोडणच्या लौरेंस आणि सिमांव या अल्वा पितापुत्रांनी इ. स.1695 मध्ये प्रसिद्ध केला. 1873 साली इनासीयु रुद्रीगीश यांनी एक कोंक पोर्तुगीज शब्दकोश तयार केला. कोंकणीचे कट्टर पुरस्कर्ते पाद्री दालगाद यांनी कोंकणी–पोर्तुगी (1893) व पोर्तुगीज–कोंकणी (1905) असे दोन्ही प्रकारचे द्वैभाषिक कोश तयार केले. मध्ययुगी कोंकणीची अशी अनेक व्याकरणे व शब्दकोश लिस्बन येथील राष्ट्रीय ग्रंथालयात व लंडनच स्कूल ऑफ ओरिएंटल स्टडीजमध्ये हस्तलिखित वा दोलामुद्रित स्वरूपात पडून आहेत. एकत्रित स्वरूपात प्रसिद्ध झाल्यास कोंकणीच्या मध्ययुगीन संरचनेचे व शब्दनिधीचे सम्य दर्शन घडू शकेल.

कोंकणीच्या स्वतंत्र अस्तित्वाची खबर पोर्तुगीजेतर युरोपियन पांडितांनाही होती. जोहा फ्रीड्रिश याने इ. स. 1948 मध्ये प्रसिद्ध केलेल्या 'प्राखमेइस्तेर' या प्रभूच्या प्रार्थना–संग्रहा नागरी लिपीतील कोंकणी प्रार्थनेचा समावेश केला आहे. ईवारीश आबेलने आपल्या 178 साली प्रसिद्ध झालेल्या 'सिंफोना सिंफोना' या ग्रंथात भारतीय भाषांतील शब्दसंग्रहाची तुलन करताना मराठीप्रमाणेच कोंकणी भाषेतील शरीरावयव, निसर्ग, प्राणी, संख्या, सर्वनामे इत्यादि अर्थगटांतील शब्दांचा समावेश केलेला आहे. जॉन लेडन नावाच्या एका युरोपीय पंडिताने 1807 साली लिहिलेला भारतीय भाषांवरील निबंध ब्रिटिश म्युझियममध्ये उपलब्ध आहे. त्यांत त्याने भारतीय भाषांचे प्रधान भाषा व दुय्यम भाषा असे वर्गीकरण केलेले असून मराठी, गुजराती वगैरे भाषा या प्रधान व्र कोंकणी, तुळु इ. भाषा दुय्यम गणल्या आहेत. इ. स. 1816 मध्ये विल्यम केरी याने केलेल्या भारतीय भाषांच्या सर्वेक्षणात तेहतीस भाषांचे नमुने आहेत. त्यात कोंकणीचाही स्वतंत्र नमुना सादर केलेला आहे. 1853 साली प्रसिद्ध झालेल्या ''प्रमुख भारतीय भाषांचे भौगोलिक वितरण'' या आपल्या इंग्रजी निबंधात मुंबई उच्च न्यायालयाचे तत्कालीन प्रमुख न्यायमूर्ती सर अर्स्किन पेरी यांनी कोंकणीचा प्रमुख भारतीय भाषा म्हणून समावेश व ऊहापोह केला आहे.

कोंकणी ही मराठीची बोली नसून एक स्वतंत्र भाषा आहे, असे साधार व सावेश प्रतिपादन करणारा आद्य संशोधक म्हणून डॉ. येलिओदोरू कुञ्ज रिव्हार (इ. स. 1800–1879) या पोर्तुगीज विद्वानाचा निर्देश करावा लागेल. याने फादर स्टीफन्सचे कोंकणी व्याकरण व कार्मेलाईट पंथीय मिशनरी रॅफाईल पेशेट्टी याचे मंगळूरी कोंकणीचे व्याकरण आणि पोर्तुगीज–कोंकणी शब्दकोश हे ग्रंथ पुनर्मुद्रित केले. एवढेच नव्हे, तर 'अेंसायु हिस्तोरिकु दा लींगुआ कोंकानी' म्हणजे 'कोंकणी भाषेवरील ऐतिहासिक निबंध' या शीर्षकाचा आपला प्रबंध 1858

साली प्रसिद्ध करून गोंयकारांच्या स्वभाषेविषयीच्या अनास्थेची खूप निंदा केली. त्यांच्यामध्ये कोंकणीसंबंधी उचित अभिमान जागृत केला. आपल्या प्रबंधात त्याने प्राचीन कोंकणी साहित्यातील उतारे व वेचे सादर करून त्यांचा पोर्तुगीज अनुवादही दिला. ख्रिस्ती प्रार्थना-मंदिरांतून कोंकणीमध्ये प्रवचने करण्याचा पायंडा यानेच पाडला. रिव्हारची मध्ययुगीन गोंमतकाच्या इतिहाससंबंधीची कामगिरीही फार मोलाची आहे. त्याने 'Archivo Portuguez Oriental' नावाची ग्रंथमाला काढून गोवा सरकारच्या दप्तरातील हजारो कागदपत्रे प्रसिद्ध केली. काही मराठी पंडितांना रिव्हारचे हे कार्य अजिबात रुचलेले दिसत नाही. त्यांनी त्याची संभावना 'कोंकणी भाषेचा पोर्तुगीज जनक' म्हणून केली आहे !

एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात आणि विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात कोंकणीविषयी एक चळवळच उभी राहिली. या काळात कोंकणीचा अनेक अंगांनी अभ्यास झाला. विशेषत: माफेय, दाल्गादु, जेर्सन दा कुन्ह, रॉड्रिग्ज सौझ, मौरांव, पिरास, द्वार्त, चव्हाण, डिसूझा, सालढाणा, रीत इ सौझ, रांजेल, शणै गोंयबाब, प्रियोळकर, प्रभुदेसाई या विद्वानांच्या ग्रंथांतून कोंकणी भाषेची संरचना, शब्दसंग्रह, संक्रमणे व साहित्य यांविषयीची नवनवीन माहिती उजेडात आली. या विद्वानांतील एका गटाने ख्रिस्ती समाजात कोंकणी भाषेविषयीची आत्मभावना चेतावली व रोमन लिपीतील कोंकणीचा पुरस्कार आणि पाठपुरावा केला. असेच कार्य कोंकणीच्या हिंदू भाषकांमध्ये एकट्या शणै गोंयबाब (वामन रघुनाथ वर्दे वालावलीकर, 1877-1946) यांनी पार पाडले. लहानमोठी चाळीस पुस्तके कोंकणी भाषेत लिहून त्यांनी रान उठवले.* देवनागरी लिपीतील कोंकणी ही गोमंतकाची राजभाषा व्हावी, हे त्यांचे एक स्वप्न होते. आपल्या वज्रलेखणीच्या माध्यमातून त्यांनी कोंकणी-विरोधकांवर घणाघाती हल्ला केला. कोंकणीची व्याकरणी बांदावळ केली. कोंकणी ही एक समर्थ भाषा आहे असा विश्वास जनमानसात रुजवला. काही मराठी पंडितांनी त्यांची संभावना 'पहिला हिंदू भेदवादी' म्हणून केली आहे !

अनंत काकबा प्रियोळकर आणि त्यांच्या संप्रदायाच्या विद्वानांनी मराठीची तळी उचलून धरली. कोंकणी ही स्वतंत्र भाषा नसून मराठीची एक बोली आहे, हे त्यांचे लाडके प्रमेय. या बोलीचे मराठीपण सिद्ध करण्यासाठी त्यांनी मध्ययुगीन कोंकणी साहित्याचा खजिनाच उघडा केला. या खजिन्यावर मराठीचा हक्क सांगण्यासाठी त्यांनी न भूतो न भविष्यति अशी डोंबारी कसरत केली; परंतु अन्तत: जैत मात्र कोंकणी भाषेचेच झाले !

* *(शणै गोंयबाब यांनी 22 पुस्तके लिहिली आहेत.)*

ग्रियर्सनने आपल्या 'भारतीय भाषांचे सर्वेक्षण' या इंग्रजी ग्रंथाच्या सातव्या खंडा (1905) मराठीबरोबर कोंकणी भाषेचाही विचार केला आहे (पृष्ठे 163 ते 216). या खंडाचे लेखन स्टेन कोनौ या नॉर्वेजियन पंडिताने केलेले असून त्यात त्याने कोंकणीचे संक्षिप्त व्याकरण आणि चित्पावनी, दालदी, नवायती, मालवणी, कुडाळी, बारदेसकरी, कारवारी सारस्वत व किरिस्तावी या बोलींचे दहा नमुने सादर केले आहेत. ग्रियर्सनच्या सर्वेक्षणात पोर्तुगीजांच्या अंमलाखालील प्रदेश, दक्षिण कानरा (मंगळूर) व मलबार (केरळ) यांचा समावेश नसल्याने त्यास कोंकणीविषयी लिहिताना प्रामुख्याने सावंतवाडी व कारवार येथून प्राप्त झालेल्या नमुन्यांवरच अवलंबून राहावे लागले. या तुटपुंज्या माहितीच्या आधारे त्याने कोंकणीस मराठीची बोली बनवून टाकली ! गोवा, मंगळूर आणि कोचीन या प्रदेशांतील कोंकणी बोलींच्या संरचनेच्या व विविधतेचा अभ्यास केला असता तर ग्रियर्सनला हे साहस झाले नसते. कोंकणीत 'राष्ट्रीय वाङ्मय'च नाही म्हणून ती 'भाषा' या कोटीत बसू शकत नाही, ही त्याची 'कसोटी' आज कालबाह्य झाली आहे. शिवाय, कोंकणीत रामायण-महाभारतादी राष्ट्रीय ग्रंथांवर आधारलेले साहित्य निर्माणच झाले नव्हते, हा दावाही आज फोल ठरला आहे. पोर्तुगीजांच्या सर्वसंहारातून कोंकणे आणि त्यांची भाषा शिल्लक राहिली हेच कौतुक; त्यापुढे पुस्तकांचे हो काय ? गोमंतकाच्या घराघरात, माजघरात, देवघरात, झोपाळ्यावर, रहाटावर, शेतावर, ओठाओठावर भारताचे राष्ट्रीय वाङ्मय आजदेखील गुंजत, हुंकारत, झंकारत आहे. भारतीय संस्कृतीचे सारे अनुबंध गोंयकारांनी आपल्या लोकसाहित्यात आणि लोककलांत देवाच्या अंगाऱ्यासारखे जपून ठेवले आहेत.

भाषाविज्ञानाच्या नवीन प्रणालीस अनुसरून कोंकणीचे शास्त्रीय संशोधन करण्याचा मान डॉ. सु. मं. कत्रे व डॉ. अ. मा. घाटगे या पुणे येथील डेक्कन कॉलेजच्या संचालकद्वयांकडे जातो. यांच्या ग्रंथांतून कोंकणीच्या भाषिक इतिहासाचे व तिच्या विविध बोलींच्या संरचनेचे सम्यक दर्शन घडते. डॉ. कत्रे यांनी आपला 'दि फॉर्मेशन ऑफ कोंकणी' हा कोंकणी भाषेच्या ऐतिहासिक व्याकरणावरील प्रबंध 1942 साली प्रसिद्ध केला. त्याची द्वितीयावृत्ती 1966 साली पुण्याच्या डेक्कन कॉलेजने प्रसिद्ध केली आहे. कत्रे यांचे संशोधन सहा प्रचलित कोंकणी बोलींच्या सामुग्रीवर तौलनिक भाषाविज्ञानाच्या तत्त्वांस अनुसरून झाले आहे. त्यांनी आपल्या अभ्यासासाठी गौड-सारस्वत, चित्रापूर-सारस्वत, गोव्यातील अन्य हिंदू समाज, मंगळूरकडील ख्रिश्चन, कारवारकडील ख्रिश्चन व गोव्यातील ख्रिश्चन अशा तीन हिंदू व तीन ख्रिश्चन समाजांच्या बोली प्रामुख्याने वापरल्या. या बोलींतील शब्द व रूपे यांच्या आधारावर कोंकणीचे

## डॉ. कत्रे यांचा अभिप्राय

*Taking into account all the main features of Konkani we may now definitely assign it to the South-Western group (having Marathi and Gujarati as its nearest of kin) with a tinge of the Central group (Hindi, especially in the dative postsposition - ka). The differentiations noted in the formation of the direct Sing. of masc. nouns in their extended form and the divergent postpositions for the dative clearly mark off Konkani as a separate language from Marathi, preserving in many respects an earlier stage of development. Its position as a separate language (and not a mere dialect) is thereby proved, but phonoglogical considerations show that both belong to a common parent prakrit.*

***- The Formation of Konkani***
***PP. 173-4 (1966 ed.)***

पूर्वरूप प्रस्थापित करून तिच्या उगमाचा मागोवा घेतला व विकासाच्या दिशा स्पष्ट केल्या. कत्रे यांनी आपल्या ग्रंथात कोंकणी ही मराठीची बोली नसून भगिनीभाषा आहे असा स्पष्ट निर्वाळा दिला आहे. आज आणखी अनेक कोंकणी बोलींचे साहित्य जमा होऊन व्याकरणे तयार झालेली असली तरी कत्रे यांनी काढलेल्या निष्कर्षास बिलकूल धक्का पोहोचलेला नाही; किंबहुना त्यांस बळकटीच आलेली आहे.

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळाच्या अनुदानावर चाललेल्या 'सर्व्हे ऑफ मराठी डायलेक्टस्' या प्रकल्पामध्ये पश्चिम किनारपट्टीवरील अनेक बोलींचे संशोधन डॉ. अ. मा. घाटगे आणि त्यांचे विद्यार्थी, डॉ. डी. एन्. शंकर भट, डॉ. वि. वा. परांजपे, डॉ. सु. बा. कुळकर्णी व डॉ. पुष्पा कारापूरकर-पै यांनी केलेले आहे. या सर्वेक्षणातर्फे प्रसिद्ध झालेल्या आठ खंडांपैकी सहा खंडांत कोंकणीच्या बोलींचे अध्ययन समाविष्ट झालेले आहे. हे खंड पुढीलप्रमाणे होत :-

- **खंड पहिला** – 'कोंकणी ऑफ साऊथ कॅनरा' (1963)
- **खंड दुसरा** – 'कुडाळी' (1965)
- **खंड चौथा** – 'कोचीन' (1967)
- **खंड पाचवा** – 'कोंकणी ऑफ काणकोण' (1968)
- **खंड सहावा** – 'मराठी ऑफ कासरगोड' (1970)
- **खंड आठवा** – 'गावडी ऑफ गोवा' (1972)

डॉ. घाटगे यांच्या सर्वेक्षणाचा उद्देश पश्चिम किनारपट्टीवरील (तथाकथित) मराठी बोलींचे भाषावैज्ञानिक विश्लेषण करून त्यांचे वर्णनात्मक व्याकरण (स्वनव्यवस्था व रूपव्यवस्था), गद्यपाठ व शब्दसंग्रह अभ्यासकांना उपलब्ध करून देणे हा होता. या बोली मराठीच्या आहेत, कोंकणीच्या आहेत, अथवा अन्य कोणत्या भाषेच्या आहेत यासंबंधीचा ऊहापोह त्यांनी विदग्धतया टाळलेला आहे. परंतु, या ग्रंथांच्या मलपृष्ठाच्या आतील मजकूर समजण्याची पात्रता असलेल्या वाचकांस क्षणार्धातच वस्तुस्थितीची कल्पना येते व घाटगे यांनी कोंकणीच्या भाषकांवर व अभ्यासकांवर अनंत उपकार करून ठेवले आहेत याची जाणीव होते.

उपरिनिर्दिष्ट सर्वेक्षणाच्या प्रथम खंडात मंगळूरकडील चित्रापूर-सारस्वतांच्या बोलीचे अध्ययन आलेले आहे. द्वितीय खंडात सिंधुदुर्ग जिल्ह्यातील कुडाळी बोलीचा अभ्यास आहे. चतुर्थ खंडात कोचीनकडील गौड-सारस्वतांच्या बोलीचे विश्लेषण आले आहे. पंचम खंडात गोव्याच्या काणकोण तालुक्यातील देसाई-गावकरांच्या बोलीचा अभ्यास आहे. षष्टम खंडात कासरगोडमधील 'मराटो' समाजाची बोली अभ्यासाचा विषय झाली आहे. अष्टम खंडात गोव्याच्या साष्टी विभागातील ख्रिस्ती गावड्यांच्या बोलीचे संशोधन आहे. अशाप्रकारे डॉ. घाटगे यांनी आपल्या सर्वेक्षणामध्ये राजापूरपासून कोचीनपर्यंतच्या भूप्रदेशात बोलल्या जाणाऱ्या अनेक (कोंकणी) बोलींचे अध्ययन करून कोंकणी ही मराठीची 'बोली' कशी नाही याचा प्रचंड पुरावाच सादर केला आहे.

घाटगे यांच्या मार्गदर्शनाखाली चाललेल्या या प्रकल्पात रायगड जिल्ह्यातील बाणकोटी कोळी बोलीचेही अध्ययन झालेले असून त्याचा खंड डॉ. सु. बा. कुळकर्णी यांनी सिद्ध केलेला आहे. त्याचे प्रकाशन अद्यापि व्हावयाचे आहे. बाणकोटी ही कोंकणी व मराठी या भाषांमधील संक्रामक बोली होय.

विद्यापीठांतील पदव्युत्तर आणि पीएच्. डी. च्या परीक्षांसाठी सादर झालेल्या प्रबंध-प्रबंधिकांतून आजवर अनेक कोंकणी बोलींचा अभ्यास झालेला आहे. उदा. वि. वा. परांजपे (कोन्नानूर येथील कऱ्हाडी बोली), स्टीफन फर्नांडो (साष्टीतील किरिस्तांव बोली), मंगेश नाडकर्णी (कन्नड व कोंकणीतील नाम-पदबंध), वसुधा भिडे (चित्पावनी बोली), सरस्वती रेगे (कुडाळी व मालवणी), रॉकी मिरांडा (कोंकणीची स्वनव्यवस्था), ललिता कत्रे (मंगळुरी), कोंकणीतील नामलिंग) के. टी. विश्वनाथ (मालवणी बोली), ललिता प्रभू (केरळी कोंकणीतील आप्तसंबंधी परिभाषा), बी. मल्लिकार्जुन (कर्नाटकीय सारस्वत बोली), सुशीला थॉमस (मंगळूरी सारस्वत बोली), इत्यादी.

भारतीय जनगणना विभागाने आपल्या भाषाविषयक ग्रंथमालेच्या चौथ्या खंडात केरळातील कोंकणीचे सर्वेक्षण केलेले असून आठव्या खंडात कर्नाटक, गोवा आणि महाराष्ट्र या तीन राज्यांतील कोंकणीचे सर्वेक्षण सादर केले आहे. या सर्वेक्षणाचे बहुतेक सर्व काम श्रीमती जे. रजाती व डॉ. कुलश्रेष्ठ यांनी केलेले असून त्यात कोंकणीच्या विविध बोली व त्यांचे भौगोलिक वितरण यासंबंधीची बरीच माहिती उजेडात आणली आहे. अलीकडे (1986 साली) कोंकणी भाषा मंडळाने सु. ज. बोरकार यांचे कोंकणी भाषेत लिहिलेले 'कोंकणी व्याकरण' प्रकाशित करून कोंकणीच्या आदेशात्मक व्याकरणाचा पाया घातला आहे.

कोंकणी भाषेसंबंधीचे बरेचसे फुटकळ लिखाण हे कोंकणी-मराठी वादामधून निर्माण झाले आहे. हा वाद केवळ वैचारिक वा तात्त्विक नव्हता. त्याला एक व्यावहारिक बाजूही होती. भाषिक वादाचे निमित्त पुढे करून दोन सामाजिक गटांत घडलेला तो एक संघर्ष होता. भौगोलिक, सामाजिक, सांस्कृतिक आणि राजकीय वेगळेपण सिद्ध करण्याचा तो एक प्रदीर्घ प्रयास होता. या वादाची पार्श्वभूमी आणि कोंकणीची भूमिका जूझे परेरा यांच्या कर्नाटक विद्यापीठाने प्रसिद्ध केलेल्या 'कोंकणी : ए लँग्वेज' (1971) या ग्रंथात सविस्तरपणे चर्चिलेली आहे. अलीकडे, रवींद्र केळेकार यांनी 'मराठी अभ्यास परिषद पत्रिके'मध्ये (वर्ष 8, अंक 1) ''मराठी-कोंकणी वाद : काही अंत:प्रवाह'' हा शोधनिबंध प्रसिद्ध करून या वादाचे सामाजिक आणि सांस्कृतिक संदर्भ स्पष्ट केले आहेत. त्यांचे विचार मराठी पंडितांना अंतर्मुख करणारे आहेत. कोंकणी-मराठी वादाची मराठी बाजू अ. का. प्रियोळकर यांच्या पुणे विद्यापीठाने प्रसिद्ध केलेल्या 'ग्रांथिक मराठी भाषा आणि कोंकणी बोली' (1966) या ग्रंथात विशद केलेली आहे.

गोव्याचे स्वतंत्र राज्य निर्माण झाल्यापासून व गोवा शासनाने कोंकणीला राजभाषा म्हणून मान्यता दिल्यापासून हा वाद संपल्यासारखा भासत असला तरी त्यातील वादावादी संपलेली नाही. किंबहुना, गोव्यामध्ये मराठीला संगत-राजभाषेचा दर्जा दिल्याने ती अधिकच वाढलेली आहे. साहित्य अकादेमीने कोंकणीला साहित्यिक भाषेचा दर्जा प्रदान केला हे अनेक मराठी पंडितांना आवडले नाही. अलीकडे (20 ऑगस्ट, 1992 रोजी), कोंकणीचा समावेश भारतीय संविधानाच्या आठव्या परिशिष्टात (अनुसूचीत) झाल्यापासून हा भाषिक वाद इतिहासजमा झाल्यासारखाच आहे. असे असले तरी त्या वादामागील स्पर्धा आणि खुमखुमी संपलेली नाही. आता तो दुसऱ्या आघाड्यांवर खेळला जाईल इतकेच !





प्रकरण नववे

# कोंकणीच्या बोली आणि प्रमाणभाषा

भाषा आणि बोली या संज्ञा विरुद्धार्थी नव्हेत. एका प्रसक्त वा अविच्छिन्न वास्तवावर केलेला तो द्वैतारोप आहे. एखाद्या उन्नत भूमिखंडाला डोंगर म्हणायचे की पर्वत हे जसे पाहणाऱ्याच्या सापेक्ष दृष्टिकोनावर अवलंबून असते, तसेच भाषा व बोली यासंबंधाने म्हणता येईल. मूलतः भाषा ही एक संप्रेषण पद्धती आहे. आपल्या भाषिक समाजाबरोबर ती सतत व नियमितपणे परिवर्तित होत असते. यामुळेच एखाद्या भाषेचा प्रारंभ कोठे झाला व अन्त कोठे झाला हे सांगणे कठीण असते. भाषा ही एखाद्या महानदीसारखी असते. उगमापासून तिला अनेक प्रवाह येऊन मिळतात. अनेक आल्याआल्याच खंडित होतात. शतशतकांच्या टप्प्यांवर ती वेगवेगळी वळणे घेत असते. आपला आकार बदलत असते. कधी तिचा प्रवाह कुंठित होतो, तर कधी विस्तारतो. कधीकधी व्याकरणाचे बांधबंधारे घालून तिचा प्रवाह आडवून ठेवतात. परंतु ती या व्यत्ययाला दाद देत नाही. ती सतत वाहतच राहते. तिच्या प्रकृतीत फारच बदल झाला तर तिला वेगळे नाव मिळते. कधी तिला लहानमोठे फाटे फुटतात. या फाट्यांनाही वेगवेगळी नावे मिळतात. तिच्या त्रिभुज प्रदेशाजवळ तर प्रवाहांचे जाळेच निर्माण झालेले दिसते.

भाषेकडे ऐतिहासिक वा कालक्रमिक दृष्टिकोनातून पाहिल्यास तिच्यावर जन्य-जनकभावाचे आरोपण करता येते. कधी ती एखाद्या एकसंध भाषेचा विग्रह वा विघटन असते; तर कधी दोन भाषा एकत्र येऊन झालेले संहतिकरण असते. एका घटनेत विकेंद्रीकरणाची तर दुसऱ्या घटनेत केंद्रिकरणाची प्रक्रिया अनुस्यूत असते. या दृष्टिकोनातून कोंकणी ही 'भाषा' व कुडाळी, बारदेशी, कारवारी इ. तिच्या 'बोली' होत असे म्हणता येईल.

एखादा भाषिक प्रभेद हा स्वतंत्र भाषा आहे की बोली आहे याचा अंतिम निर्णय तो प्रभेद वापरणारे भाषकच घेत असतात. वैयाकरणांची भूमिका केवळ निरीक्षकाची असते. त्यांनी काही सिद्धान्त बांधलेच, तर त्यांस अधिकांश तात्त्विक मूल्य असते; व्यावहारिक नव्हे. सामान्यत: हे सिद्धान्त दोन प्रकारच्या निकषांवर आधारलेले असतात. पहिले भाषिक वा संरचनात्मक आणि दुसरे सामाजिक वा कार्यात्मक. भाषिक निकषांत त्या भाषेला स्वतंत्र व्याकरण आहे की नाही; पर्याप्त शब्दसंग्रह आहे की नाही - अशासारख्या गोष्टींचा विचार होतो. वस्तुत: कोणत्याही संदेशन-पद्धतीला स्वतंत्र नियम व ती वापरण्यास आवश्यक तेवढी संकेतचिन्हे असतातच. प्राय: शब्दसंग्रहाचे आकारमान हे भाषिक समाजाच्या संस्कृतीच्या संकीर्णतेच्या प्रमाणात असते. सामाजिक निकषांत त्या भाषेची प्रादेशिकता, साहित्य-परंपरा, आंतरप्रदेशीय संप्रेषणक्षमता, परस्पर-आकलनीयता, लिपिपरंपरा, प्रमाण व प्रतिष्ठित माध्यमाची उपलब्धता इ. बाबींचा विचार होतो. भाषेला बोलीपेक्षा अधिक मान्यता असते. ती संदेशनव्यवहाराचा अधिनिविष्ट दंडक असते. भाषेत बोलीचा समावेश होऊ शकतो. परंतु बोलीत भाषा समाविष्ट होऊ शकत नाही. भाषा ही प्रतिष्ठित असते; तर बोलीचे स्थान गौण असते. भाषेची प्रतिष्ठा तिच्या प्रशासन व अनुशासन व्यवहारक्षमतेवर आधारलेली असते. साहित्य-निर्मिती, शिक्षण, वैचारिक देवघेव, लेखन-वाचन-मुद्रण, धार्मिक व्यवहार इ. महत्त्वाच्या गोष्टींचे ती वाहन असते. शुद्धाशुद्धतेचे दंडक तिच्यावर आधारलेले असतात.

कोंकणीला भाषेचा दर्जा नाकारण्यामागे काही व्यक्तिंचा वैयक्तिक स्वार्थ होता; तर काही सामाजिक गटांची साम्राज्यवादी मनोवृत्ती होती. अपूर्ण माहिती, वस्तुस्थितीचे अज्ञान व चिंतनाचा अभाव अशीही काही कारणे सांगता येतील. आज परिस्थिती पालटलेली आहे. कोंकणी भाषकांनीच प्रचंड रवाने घोषणा केली आहे, की आमची भाषा ही 'भाषा' आहे; 'बोली नव्हे !'

राजापूरपासून कोचीनपर्यंतच्या किनारपट्टीत सलगपणे बोलल्या जाणाऱ्या या भाषेचे अनेक प्रभेद आहेत. हे प्रभेद प्रामुख्याने प्रादेशिक व सामाजिक अशा दोन अक्षांवर आधारलेले आहेत. प्रदेशपरत्वे कोंकणीचे 'उत्तर कोंकणी', 'मध्य कोंकणी' (गोमंतकी) व 'दक्षिण कोंकणी' असे तीन प्रभेद संभवतात. ऐतिहासिक परिवर्तन हे या प्रभेद-निर्मितीचे प्रमुख कारण असले तरी स्थलांतरण, भिन्न राजसत्ता व अन्यभाषाप्रभाव ही कारणेही कमी बलवत्तर नाहीत. ढोबळमानाने असे म्हणता येईल, की महाराष्ट्रातील सिंधुदुर्ग जिल्ह्यात बोलली जाणारी कोंकणी भाषा ही उत्तर

कोंकणी होय. गोमंतकात बोलली जाणारी कोंकणी भाषा ही मध्य कोंकणी वा गोमंतकी होय. कर्नाटक व केरळ राज्यात बोलली जाणारी कोंकणी भाषा ही दक्षिण कोंकणी होय. प्रादेशिक प्रभेदांचे हे वर्गीकरण केवळ भौगोलिक वितरणावर आधारलेले नाही. त्यास ऐतिहासिक आणि संरचनात्मक वैशिष्ट्यांचाही आधार आहे.

उत्तर कोंकणीवर मराठी भाषेचा प्रभाव आहे. ही मराठी म्हणजे ग्रियर्सनने निर्देशिलेली 'कोंकण स्टँडर्ड' म्हणजेच कोंकणात बोलली जाणारी प्रमाण मराठी होय. मुंबई व पुणे शहरांत कोंकणी बोलणाऱ्यांची संख्या लक्षणीय असली तरी तेथे कोंकणीचा स्वतंत्र प्रभेद विकसित झालेला नाही. तेथील कोंकणीचे भाषक आपापल्या स्थलांतरणपूर्व बोलीचाच वापर करतात. मध्य कोंकणीवर पोर्तुगीज व ग्रांथिक मराठीचा प्रभाव आहे. दक्षिण कोंकणीच्या कारवार, सुपे, हल्याळ, कुमठा या भागातील कोंकणीवर कन्नडचा, भटकळमधील कोंकणीवर अरबीचा, मंगळूरकडील कोंकणीवर कन्नड व तुळूचा, कासरगोडमधील कोंकणीवर कन्नड, मल्याळम व कोडुगूचा (कुर्गीचा), तर कोचीनकडील कोंकणीवर मल्याळमचा प्रभाव आहे.

नदी, खाडी, डोंगराची रांग, पर्वत, द्वीपरचना अशांसारख्या प्राकृतिक कारणांनी भाषिक प्रदेश सीमित होत असतात. त्याचप्रमाणे भिन्न राजसत्तांच्या आधिपत्याखाली दीर्घ काळ राहिल्यानेही भाषिक समाज अन्य समकुलीन भाषिक समाजांपासून विभक्त होत असतात. धर्म, जात, वर्ग, पंथ, व्यवसाय, शैक्षणिक पातळी, सामाजिक स्तर, स्थलांतरे, परभाषाप्रभाव इत्यादी कारणांनीही त्यांच्यामध्ये उपगट तयार होतात. पिढ्यानपिढ्या विभक्त राहिल्याने त्यांच्या भाषा स्वतंत्रपणेपरिवर्तित होतात व कालांतराने त्यांस वेगळा तोंडवळा प्राप्त होतो. पोर्तुगीजांच्या धार्मिक धोरणामुळे गोमंतकीय समाजात हिंदु व ख्रिस्ती अशी उभी फळी निर्माण झाली. रोटीबेटी व्यवहार बंद झाले. परिणामत: या दोन सामाजिक गटांच्या भाषा स्वतंत्रपणे परिवर्तित होत गेल्या व कोंकणीचे अनेक प्रभेद उदयास आले. यातच हिंदूंच्या संसक्त जातिव्यवस्थेमुळे निर्माण झाल्या मूळच्या जातिबोली होत्या त्या होत्याच. कोंकणीच्या अशा विविध प्रादेशिक व सामाजिक प्रभेदांमध्ये सांप्रत धृवीकरणाची प्रक्रिया वेगाने सुरू असल्याने कोंकणी बोलींचे चित्र फारसे स्पष्ट नाही. असे असले तरी प्रादेशिकता, परंपरा व संरचना-वैशिष्ट्ये यांच्या आधारांवर कोंकणी बोलींचे वर्गीकरण पुढीलप्रमाणे करता येईल.

## कोंकणीच्या बोली

| प्रमुख बोली | प्रादेशिक प्रभेद | सामाजिक प्रभेद |
|---|---|---|
| उत्तर कोंकणी | मालवणी<br>कुडाळी | चित्पावनी |
| मध्य कोंकणी (गोमंतकी) | बारदेशी<br>सासष्टी<br>अंत्रूजी<br>काणकोणी | गावडी |
| दक्षिण कोंकणी | कारवारी<br>मंगळूरी<br>कासरगोडी<br>केरळी | नवायती<br>कऱ्हाडी<br>काड्डी<br>कुडुंबे |

कोंकणीच्या या बहुविध बोलींपैकी कोणत्या बोलीला प्रमाण मानावयाचे ही एक जटील समस्या गोंयकारांसमोर उभी आहे. दैनंदिन लोकव्यवहार बोलीभाषेत निभावून गेला तरी शिक्षण, राजव्यवहार, साहित्यनिर्मिती, वृत्तव्यवसाय इ. क्षेत्रांत प्रमाण माध्यमाची जरुरी असते. गोवा स्वतंत्र झाल्यापासून ही समस्या अतिशय तीव्र झाली. स्वातंत्र्यपूर्व काळात विविध कोंकणीभाषी समाज लेखनवाचनासाठी आपापल्या बोलीचा वापर करीत. लिपी देखील एक नव्हते. प्रमाण माध्यम विकसित झालेले नव्हते. या दुर्बलतेचा फायदा घेऊन गोमंतकावर मराठीचा वरवंटा फिरविण्याचा घाट काही धूर्त मंडळींनी घातला. परंतु तो यशस्वी झाला नाही. लावण्याची नव्हाळी घेत प्रमाण कोंकणी विकसित होऊ लागली.

कोणत्याही भाषेच्या प्रमाण बोलीचे काही विशेष गुणधर्म असतात. प्रथम म्हणजे ती कुंचनशील आणि व्यात्त असते. ज्याप्रमाणे कुंचनशील वस्तू कोणत्याही दिशेने ताणता येते व तिचा संकोच करता येतो; त्याचप्रमाणे प्रमाण बोली देखील आपल्या विविध सामाजिक गटांतील भाषकांच्या गरजांनुसार नवनवीन रूपे धारण करीत असते. व्यात्ततेमुळे तिच्यामध्ये कोणत्याही नव्या संकल्पना व्यक्त करण्याचे सामर्थ्य येते. ती स्थिर दिसली तरी भाषकांच्या जीवनप्रवाहाबरोबर सतत वाहत असते, परिवर्तित होत असते. म्हणूनच 'लवचिक स्थिरता' हा प्रमाण बोलीचा

प्रधान विशेष समजला जातो. सामान्यत: सुशिक्षित, सुसंस्कृत, मेधावी, राजमान्य व नागर जनांची भाषा ही प्रमाण बोलीची भूमिका वठवीत असते. अन्य बोलींच्या भाषकांस ती आदर्श व अनुकरणीय वाटते. म्हणूनच पॉल गार्विन या भाषावैज्ञानिकाने प्रमाण बोलीची व्याख्या ""A codified form of language, accepted by, and serving as model to, a larger speech community" अशी केली आहे.

संरचनेच्या दृष्टीने प्रमाण बोली ही अन्य बोलींहून फारशी वेगळी नसते. तिचा शब्दनिधीही वैविध्यपूर्ण, विस्तृत व समावेशक असतो. वृत्तपत्रे व साहित्य यांच्या लेखनाचे माध्यम तीच असल्याने तिचा प्रभाव व प्रसार दूरवर होत असतो. अनेक बोलीक्षेत्रे एका छत्राखाली आणणे, अन्य भाषिक समाजांपासून भिन्नत्व दर्शविणे, लेखनातील शुद्धाशुद्धतेचा व मान्यतेचा दंडक होणे ही तिची कार्ये असतात. प्रमाण बोलीकडे पाहण्याचा भाषिक समाजाचा दृष्टीकोन हा स्वाभिमानाचा, मानमान्यतेचा व जागृतिपूर्ण असतो.

प्रमाण बोलीचा वापर सर्वच भाषकांना सारख्याच कुशलतेने करता येतो असे नाही. नुसते बोलणे आणि लिहिणे म्हणजे भाषा येणे असे नव्हे. भाषिक कौशल्ये नाना प्रकारची असतात. श्रवण, भाषण, वाचन, लेखन, पठण, संभाषण, अनुनयन, निवेदन, विज्ञापन, निरूपण, सारमंथन, गायन, भजन, अनुवादन, वर्णन, विवरण, निबंधन, मनन, चिंतन, वक्तृत्व, चर्चा, प्रवचन, कीर्तन, परिसंवाद, वादविवाद, भांडण, वाक्ताडन, आक्रोश, कांगावा, पत्रकारिता, साहित्यनिर्मिती इ. नानाविध कौशल्यांसाठी भाषेचा वापर होत असतो. या विविध कौशल्यांचे वाहन होण्यास कोंकणीची कोणती बोली सक्षम आहे?

वरील विवेचनाच्या पार्श्वभूमीवर कोंकणीच्या प्रमाण भाषेचा विचार केल्यास गोमंतकातील सारस्वत समाजाच्या भाषेस कोंकणीची प्रमाण बोली मानावी लागेल. सारस्वतांमध्येही गौड-सारस्वतांची व अंत्रूज महालात बोलली जाणारी बोली ही अधिक प्रमाण व पायाभूत होय. विशेष म्हणजे, सारस्वत समाज हा गोमंतक, कारवार, मंगळूर, मुंबई, पुणे अशा विस्तृत क्षेत्रात पसरलेला असून संख्याबलानेही मोठा आहे. या समाजाचे लोक सुशिक्षित, उद्योगप्रिय, प्रगतिशील दृष्टीकोनाचे, कला व साहित्य यांत अभिरुची असलेले, सामाजिक व सांस्कृतिक कार्यांत रस घेणारे, आणि व्यवसायांच्या नाना परींत पुढे असलेले असे आहेत. या समाजाच्या बोलीचे आकलन सर्वच कोंकणी भाषकांना चांगल्या प्रकारे होत असते. अनेक

सारस्वतेतरांना तर ती चांगल्या प्रकारे बोलताही येते. साष्टी, तिसवाडी आणि बारदेश तालुक्यातील ख्रिस्ती समाजाची बोली वगळल्यास उर्वरित गोमंतकातील विविध बोली संरचनेच्या दृष्टीनेही या बोलीपासून फारशा भिन्न नाहीत. या बोलीचा शब्दनिधीही अचंबा करण्यासारखा समृद्ध आहे. केवळ माडाच्या झाडाशी संबंधित असे शंभरावर वेगवेगळे शब्द या बोलीत वापरात आहेत!

ख्रिस्तपुराणाच्या प्रस्तावनेत फादर स्टीफन्स गोमंतकातील कोंकणीचा 'ब्राह्मणांची भास' म्हणून निर्देश करतो. याच भाषेची 'उत्तरें' म्हणजे शब्द ठाईं ठाईं मिसरित करून त्याने आपले पुराण सोपे केले आहे. स्टीफन्सचे इ.स.1622 मध्ये प्रसिद्ध झालेले 'दौत्रिन क्रिश्तां' हे कोंकणी भाषेतील आद्य मुद्रित पुस्तक होय. सतराव्या शतकातील रिबैरु, सालदांज, आल्मैद, पेद्रोज इ. पाद्र्यांनी या भाषेचा उल्लेख "Lingoa Bramana Vulgar' म्हणजे 'ब्राह्मणांची प्रचलित भाषा' असा केला आहे. प्रा.अ.का.प्रियोळकर यांच्या मते गोमंतकाचे सांस्कृतिक केंद्र सासष्ट होय. येथील सुशिक्षित लोकांची म्हणजे शेणव्यांची बोली मिशनऱ्यांनी आपल्या लेखनांसाठी निवडली व सासष्टी हे आपल्या चळवळीचे केंद्र केले. या मिशनऱ्यांचे वास्तव्यही सासष्टीमधील बाटलेल्या शेणव्यांमध्येच होते. शणै गोंयबाब यांनी आपल्या लेखनासाठी वापरलेली व 'व्याकरणी बांदावळ' केलेली बोली हीच होय. बा.भ.बोरकर, मनोहरराय सरदेसाय, र.वि.पंडीत, रविंद्र केळेकार, द.कृ.सुखठणकर, पुंडलिक नायक, उदय भेंब्रे यांसारख्या ज्येष्ठ साहित्यिकांची प्रतिभा याच बोलीत फुलली. कोंकणीची प्रमाण बोली हीच होय. वृत्तपत्रे, नियतकालिके, ललित साहित्य, पाठ्यपुस्तके, आकाशवाणीवरील निवेदने यांसाठी हीच बोली वापरली जाते. शासन व्यवहाराचे माध्यम म्हणूनही याच बोलीचा उपयोग केला जातो. कोंकणीची प्रस्तुत बोली प्रमाणीकरणाच्या अवस्थेतून झपाट्याने पुढे जात आहे. कोंकणीसंबंधीची अस्मिता सध्याप्रमाणे प्रज्वलित राहिल्यास लवकरच ती 'लवचिक स्थिरते'च्या कसोटीस उतरेल. या बोलीचे प्रमाणभूत व आदेशात्मक व्याकरण तयार झाल्यास स्थिरीकरणाच्या प्रक्रियेस अधिकच गती येईल. मानक शब्दकोशही बनवावा लागेल.



प्रकरण दहावे

# कोंकणी साहित्याचे नवे उन्मेष

कोंकणीची कूस उजवी आहे. एकाहून एक सरस अशा प्रतिभावंतांची आणि प्रज्ञावंतांची ती जन्मदात्री आहे. तिच्या सुपुत्रांनी तिला साहित्यलेण्यांनी नखशिखांत मढवून काढली. एवढेच नाही, तर तिची कीर्ति दशदिशांस पसरवून दिली. बा.भ.बोरकरांसारखा प्रतिभाशाली परीस तिने मराठी भाषेला दिला. एम्. गोविंद पै यांच्या कुसुमकरांनी कन्नड भाषेच्या कर्णांस काव्याची कुंडले चढविली. आर.सी.शर्मांनी कोंकणी रामायण तर रचलेच; पण शिवाय मल्याळम भाषेला साहित्यमाळा अर्पण केल्या. अर्मांडो मिनेझिश यांनी आंग्लभाषेच्या कोमल करंगळीवर काव्यमुद्रिका चढविली; तर अदेवदातु बार्रेतु आणि नशिमेंत मेंदोंझा यांनी पोर्तुगीज भाषेला पद्यपुष्पे प्रदान केली. फ्रँक मोराएस यांच्यासारखा थोर वृत्तपंडीत कोंकणीनेच जगाला अर्पण केला. काका कालेलकरांची प्राजक्तप्रतिभा तर मराठी, गुजराती, हिंदी या भारतीय भाषांतून सारख्याच प्रीतीने दरवळली. परंतु कोंकणीसंबंधीची अविकसित अस्मिता कणाकणाने फुलविण्याचे कठीण कार्य एकट्या वालावलीकरांनी एकलव्याच्या एकनिष्ठेने पार पाडले. कोंकणीला सुजाण साहित्याचे प्रभावी माध्यम म्हणून पुढे आणण्याचे श्रेय वालावलीकरांचेच आहे.

वालावलीकरांपूर्वीची कोंकणी साहित्याची चळवळ गोवा आणि मंगळूर येथील कॅथॉलिकांपुरती सीमित होती. या कॅथॉलिक मंडळींचा सांस्कृतिकदृष्ट्या अतोनात छळ झालेला होता. त्यांच्या राष्ट्रीय भावनेचे अंकुर पोर्तुगीजांनी हेतुपुरस्सर आणि पद्धतशीरपणे खुडून टाकले होते. कोंकणीचा त्याग करावा म्हणून पोर्तुगीज भाषेचे लोढणे त्यांच्या गळ्यात अडकवले होते. परंतु ती परकी भाषा त्यांच्या लोकव्यवहाराची आणि साहित्याची भाषा कधीच होऊ शकली नाही. या कॅथॉलिकांनी कोंकणी भाषेत धार्मिक साहित्य व कथा-कादंबऱ्यांचे उदंड पीक काढले. नियतकालिके आणि पत्रके काढली. यांतील पन्नास वर्षांपूर्वी जन्माला घातलेली नियतकालिके

आजमितीलाही तग धरून आहेत. 'वावराड्यांचो इश्ट' हे पिलार-गोव्यामधून प्रकाशित होणारे नियतकालिक तर गेली 75 वर्षे सातत्याने निघत आहे. या काळातील रेजिनाल्द फेर्नांदिश, कारिदाद दामासियानु फेर्नांदिश, इलियट द एली, फादर मेंदिश इ.लेखकांनी निर्माण केलेले साहित्य मोठे दर्जेदार होते असे नव्हे; परंतु ते लोकप्रिय होते. पोर्तुगीज, इंग्लिश, मराठी वा कन्नड न जाणणाऱ्या तळागाळाच्या लोकांची सांस्कृतिक गरज ते भागवित होते. हे साहित्य गोव्यामध्ये रोमन लिपीत, तर मंगळूरकडे कन्नड लिपीत मुद्रित होई. इ.स.1894 मध्ये जन्माला आलेल्या 'उदेंतेचें साळक' या रोमन लिपीतील पाक्षिकाने तर अशा साहित्याची जाणीवपूर्वक जोपासना केली. त्याचे श्रेय या पाक्षिकाचे तत्कालिन संपादक एदुआर्दु ब्रनु द सौझ यांच्याकडे जाते. प्रो. जुआकीं आंतोनियु फेर्नांदिश यांनी सौझ यांचे कार्य अधिक विद्वत्तापूर्ण रीतीने पुढे चालविले. त्यांचा 'आमचो सोडवोणदार' हा ग्रंथ तर कोंकणीचे साहित्यनिधान होय.

'उदेंतेचें नेकेत्र' आणिर 'दोर म्होयन्याची रोटी' (1914 कराची, 1964 गोवा) ही नियतकालिके प्राधान्येकरून धार्मिक स्वरूपाची असली तरी कोंकणी साहित्याचे माध्यम म्हणून पुढे आणण्याचे काम त्यांनी प्रचंड प्रमाणांत केले. पाद्री आंतोनियु पेरैर, पाद्री मोरेन द सोज, फेलीसियु कार्दोझु, एव्हाग्रियु जॉर्ज, पाद्री जुदास बारुश इ. साहित्यिकांनी ही परंपरा अधिकाधिक पुष्ट केली. शिरलीचे पाद्री आंतोनियु पेरैर (1919-) यांची रोमन लिपीतील 'ओंवळां', 'काळजीदार' 'गोयचें माणीक', 'तुजो विचार', 'कुर्पेची कीर्णां', 'जात्रेकार जुझे' इ. पुस्तके कोंकणीच्या प्रासादिक लेखनाचे उत्कृष्ट नमुने आहेत. साष्टीतील सुरावलीचे फेलीसियु कार्दोझु (1932-) हे स्वातंत्र्य सैनिक म्हणून सुप्रसिद्ध आहेत.* यांनी 'गोंयचो साद', 'सत', 'दिवटी', 'लोकसाद' ही रोमन लिपीतील कोंकणी नियतकालिके चालविली. यांचे 'तुफान' आणि 'निमणी इत्सा' हे कथासंग्रह बरेच गाजले. बारदेशमधील पिळर्ण गावचे पाद्री मोरेन द सौझ (1923- ) यांनी 'दर म्होयन्याची रोटी' या मासिकाचे संपादन करून कोंकणीतील 'कातोल्क' लिहिणाऱ्या साहित्यिकांना एकत्र आणण्याचे मोठेच कार्य केले.

कन्नडभाषी प्रदेशात कोंकणीच्या लेखनासाठी कन्नड लिपीचा वापर होई. इ.स.1878 मध्ये फादर मॅफे या इटालियन धर्मोपदेशकाने कन्नड लिपीतील कोंकणी शब्दकोश व कोंकणी व्याकरण तयार करून छापून काढले. त्यांचेच अनुकरण करून मिगेल कुलासु आणि रायमुंदु

* *(श्री. फेलिसियु कार्दोज व फा. आंतोनियु परैर यांना 2004 साली मरण आले.)*

ास्कारेंनास यांनी कन्नड लिपीतील कोंकणी पुस्तके तयार करण्याचा सपाटा चालविला. ास्कारेंनास यांनी बायबलच्या नव्या कराराचा कोंकणी अनुवाद केला.

1912 सालापासून 'दिर्वे' या नियतकालिकाचे प्रकाशन सुरु झाले आणि कोंकणी ाहित्याच्या क्षेत्रात नवे युग अवतरले. कथा आणि काव्य लेखनास अभूतपूर्व उधाण आले. दिर्वेंचे पहिले संपादक लुई द मास्कारेंनास हे निसर्गाचे भोक्ते आणि श्रेष्ठ दर्जाचे कवी होते. यांचे अब्रावाचें यज्ञदान' हे काव्य कोंकणी साहित्यातील एक अनमोल मौक्तिक होय.

पेद्रु जुवांव सौझ हे धार्मिक संदर्भातून बाहेर पडलेले दिर्वेंचे पहिले संपादक होत. कोंकणी साहित्याचे पितामह म्हणून त्यांची गणना केली जाते. त्यांनी शेक्सपियर आणि कॅनन स्मिथच्या साहित्याचा कोंकणीत अनुवाद केला. सौझ यांच्यानंतर आलेक्स पाइश यांनी जवळजवळ दोन तपे दिर्वेंचे संपादन केले. त्यांच्या नावावर लघुकथांचे अनेक संग्रह आहेत.

दिर्वेंने अनेक नवनवीन लेखक उदयास आणले. त्यांत जुजे रेगु, सिल्वेस्टर मेनेझिश, फेलिक्स नोरोंज यांचा समावेश होतो. आंतोनियु जुवाव द सौझ (मारिदास), लेओ सौझ, बोतेल्यु, जॉन कार्लु हे कर्नाटकातील काही प्रसिद्ध कोंकणी कवी होत.

मंगळूरचे चा.फ्रा.द. कोश्ता (1931-1992) हे कोंकणीचे बंडखोर कवी म्हणून ओळखले जातात. हे मुंबईस राहून 'विशाळ कोंकण' नावाचे नियतकालिक काढीत. पुढे 'उदेक' नावाचे नियतकालिक काढू लागले. यांची 'सोबीत संवत्सर' 'भांगर मनीस' 'सुणे मांजर हांसता', 'तरने तरने मोर्ने' ही नाटकेही प्रसिद्ध आहेत. मंगळूरकडीलच जॉन बापतिस्त मोरायश (1931) यांना बालपणापासून काव्याची गोडी होती. यांचे 'नवी होंकल' व 'भितरलें तुफान' हे काव्यसंग्रह आणि 'कोशेदान केल्लो खून' हा कथासंग्रह प्रसिद्ध आहे.

कन्नड लिपीतील कोंकणी साहित्यात नाटके व कादंबऱ्यांची रेलचेल आहे. मार्तिन द सौझ, एस.मिरांद, चा.फ्रा.द. कोश्ता, फ्रेड फेर्नांदिश, सिरिल व्हिएगाश, विल्फ्रेद रॉबिनबास, व्हालेरियानु वाझ, गब्बू इ. नाटककारांची नाटके फार लोकप्रिय आहेत.

कादंबरीकारांमध्ये जुआकी सांतान आल्वारिश हे प्रमुख होत. त्यांची पहिली कादंबरी 'आन्जेल' ही होय. त्यांनी सुमारे पंचवीस कादंबऱ्या लिहिल्या. व्ही.जे.पी.सालदांज हे त्यांच्या ऐतिहासिक कादंबऱ्यांसाठी प्रसिद्ध होत. गब्बू, श्रीमती एव्लालिय आल्वारिश, कु.आयरीन

पिंतु, टी.ए.लोबु, प्रदीप सिरिवंत, एद्विन द सौझ, वासू हे काही अतिशय लोकप्रिय कादंबरीकार होत.

'दिर्वे'चे युग 1938 पर्यंत चालले. 'दिर्वे'नंतर 'राखणो', 'सुख-दुख' 'पोयणारी' आणि 'मित्र' या नियतकालिकांनी नवीन प्रतिभेची जोपासना केली. यांतील 'राखणो' हे साप्ताहिक आजही नेटाने प्रसिद्ध होते.

ऐतिहासिक कारणांनी कोंकणी साहित्य प्रामुख्याने देवनागरी, रोमन व कन्नड या तीन लिप्यांमध्ये विभागले गेले. इ.स.1950 च्या आसपास, म्हणजे गोव्याच्या स्वातंत्र्य चळवळीच्या काळात कोंकणी साहित्य परिषदेने कोंकणी साहित्याच्या निर्मितीस मोठी चालना दिली. देवनागरीचा प्रमुख लिपी म्हणून सर्वांनी स्वीकार करावा यासाठी निकराचे प्रयत्न झाले. तेव्हापासून कोंकणी साहित्यिकांची नवी पिढी देवनागरीत लेखन करीत आहे.

रोमन आणि कन्नड लिप्यांमधून आजही लेखन होत आहे; परंतु ते वडीलधाऱ्या मंडळींसाठी होय. नवी लिपी शिकून आंगवळणी पाडणे त्यांना आज शक्य राहिलेले नाही.

गोमंतकांच्या स्वातंत्र्य चळवळीने (1946-1961) साहित्यिकांना भाषिक वस्तुस्थितीचे नवे भान आले. कविवर्य बा.भ.बोरकर आणि लक्ष्मणराव सरदेसाई हे आतापर्यंत मराठीत लिहिणारे साहित्यिक या चळवळीच्या अग्रभागी होते. गोमंतकातील जनसामान्यांपर्यंत पोहोचायचे असेल व त्यांना एकत्र आणायचे असेल तर मराठीचा उपयोग नाही, तेथे कोंकणीच पाहिजे हे त्यांस कळून चुकले. या आकलनाने गोव्यात सामाजिक आणि राजकीय साहित्याचा पाऊस पडू लागला. वृत्तपत्रांची पूर्वी कधी नव्हती एवढी भरभराट झाली.

बा.भ.बोरकर ऊर्फ बाकीबाब (1910-1984) यांनी कोंकणी गीते लिहिली एवढेच नव्हे, तर ते कोंकणीचे खंदे पुरस्कर्ते झाले. त्यांनी 'पोर्जेचो आवाज' (लोकांचा आवाज) या नावाचे साप्ताहिक सुरु केले. आपल्या भावगीतांचा 'पायजणां' या शीर्षकाचा संग्रह काढून कोंकणी काव्याला एक नवीन दिशा व नवीन नाद दिला. गीतेचा समश्लोकी अनुवाद करून कोंकणीचे अंगभूत सौंदर्य आणि सामर्थ्य यांचा साक्षात्कार घडविला. खलील जिब्रानच्या 'पैगंबर'चाही कोंकणी अनुवाद केला. लेगरकिस्टची कादंबरी 'बाराब्बास', देवलांचे 'संशयकल्लोळ' आणि विनोबांची 'गीता-प्रवचने' कोंकणीत आणली. 'भजगोविंद' या नावाने

शंकराचार्यांच्या संस्कृत श्लोकांचा कोंकणी अनुवाद केला. त्यांचे 'संजीवनी' हे वृंदगान तर कोंकणी साहित्याचे अनमोल लेणे आहे. आपल्या 'कोंकणी संस्कृताय' या निबंधातून त्यांनी कोंकणीच्या परंपरेचे दर्शन घडविले. निसर्गसौंदर्य व स्त्रीलावण्य यांच्यामधून बोरकरांना जीवनचैतन्याचा साक्षात्कार होताना दिसून येतो. त्यांच्या शैलीची प्रकृती अलंकरणशील, गेय व संस्कृतनिष्ठ असून त्यांचे संगीतप्रेम त्यांच्या काव्यातील शब्दाशब्दामधून प्रतीत होते. कोंकणीबरोबरच मराठीतही त्यांनी विपुल लेखन केले व मानसन्मान प्राप्त केला.

सावयवेरें येथील लक्ष्मणराव सरदेसाय (1904-1986) हे गोमंतकाचे अग्रणी स्वातंत्र्यवीर होत. आग्वादच्या बंदिखान्यात एक अख्खे वर्ष काढलेल्या लक्ष्मणरावांनी 'पोर्जेचो आवाज' या नियतकालिकात नियमाने लेखन केले. त्यांचे ज्वलंत निबंध, सुंदर लघुकथा आणि सुबद्ध शब्दचित्रे यांनी कोंकणी सरस्वतीला नवा साज दिला. कोंकणीशिवाय मराठी व पोर्तुगीज भाषांतूनही त्यांनी लेखन केले. त्यांच्या सर्वच साहित्यात अनुभूतीचे सार व उमाळ्याची धार आढळून येते. त्यांचा 'खबरी' हा निबंधसंग्रह आणि 'पापडां कवळ्यो' व 'कथा -शिल्प' हे ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

गोमंतकाच्या समाज आणि संस्कृतीत रममाण झालेल्या कोंकणी साहित्याला अखिल भारतीय आयाम देण्याचा आद्य प्रयत्न रवींद्र केळेकार (1925-) या साहित्यिक आणि तत्वज्ञाने केला. गांधीजींच्या आचारविचार आणि सत्याग्रहाच्या महामंत्राने भारावलेल्या रवींद्र केळेकारांनी मुंबईत 'गोमंत भारती' ही संस्था स्थापन करून गोमंतकाच्या स्वातंत्र्यलढ्यात उडी घेतली. कोंकणी भाषेचे खंदे पुरस्कर्ते म्हणून त्यांचा लौकिक आहे. 'मीर्ग' आणि 'गोमंतभारती' या नियतकालिकांतून लेखन करून त्यांनी गांधीजींच्या साहित्याचा कोंकणी अनुवाद 'अशे आशिल्ले गांधीजी' या शीर्षकाने प्रसिद्ध केला. गोवा मुक्तीनंतर त्यांनी आपली लेखणी चौफेर चालविली.

गोव्याच्या राष्ट्रवादाचे जनक म्हणून टी.बी.कुन्ह यांची गणना होते. त्यांनी 'आझाद गोंय' नावाचे साप्ताहिक काढून स्वातंत्र्य लढ्याची ज्योत चेतविली. लुसियु रुद्रीगीश (1915-1973) ह्या मुंबईतील एल्फिन्स्टन कॉलेजात इंग्रजीचे प्राध्यापक असलेल्या स्वातंत्र्यसैनिकाने 'पोदेर' 'रायबारी' यांसारखे उत्कृष्ट निबंध लिहिले अणि गोमंतकाच्या लोकसाहित्याच्या संशोधनात आपले आयुष्य वेचले.



गजानन रायकर आणि अभिजीत (वामन सरदेसाय) या कवींनी कोंकणीला सुंदर भावगीतांचा साज चढविला.

कोंकणीचा संदेश रेइज मागुश आणि आग्वादच्या बंदिखान्यांतून पोहोचलेला होता. तेथील राजबंद्यांनी नागेश करमली (1933-) यांच्या संपादकत्वाखाली 'जोत' नावाचे मासिक चालविले. केंपे येथील या तरूण स्वातंत्र्य सैनिकास दलितांविषयी प्रामाणिक तळमळ होती. पणजी येथील आकाशवाणीवर काम करीत असतांना करमली यांचे 'जोरगत' व 'सांवार' हे काव्यसंग्रह प्रसिद्ध झाले.

याच कालखंडात आकाशवाणीने मुंबई व नवी दिल्ली स्टेशनावरून कोंकणी कार्यक्रम ध्वनिक्षेपित करण्यास प्रारंभ केला. यामुळे तीन लिप्यांतील तीन विश्वांमध्ये विभागले गेलेले कोंकणी साहित्यिक एकत्र येण्यास मदत झाली.

'दिर्वें'च्या प्रकाशनापासून सुरु झालेला हा कोंकणी साहित्याचा कालखंड दिर्वेंयुग म्हणून ओळखला जातो. या कालखंडातील साहित्यिकांनी कोंकणीविषयीची अस्मिता प्रज्वलित करून गोमंतकाच्या स्वातंत्र्ययज्ञात आपला हविभाग अर्पण केला.



प्रकरण अकरावे

# मोगरा फुलला

19 डिसेंबर 1961 रोजी पोर्तुगीजांच्या मगरमिठीतून गोमंतक मुक्त झाला आणि कोंकणी साहित्याचा मोगरा फुली आला. गोंयकारांच्या प्रतिभेला सर्व बाजूंनी धुमारे फुटले. सर्व प्रकारच्या साहित्याचा सडा पडू लागला. वृत्तपत्रांवरील सेन्सॉरशिपची बंधने उठल्यामुळे एका रात्रीत वृत्तपत्रांचा पाऊस पडला. बयाभाव (का.श्री.नायक) (1899-1983) आणि बाकीबाब (बा.भ.बोरकर) (1910-1984) यांनी कोंकणी काव्य आकारास आणले होतेच. नव्या पिढीने त्यात जीव भरला. लघुकथा, एकांकिका, निबंध या वाङ्मय प्रकारांना मरगळ आली होती; ती झटकून साहित्यिक कामाला लागले. गोंयकारांच्या सामाजिक आणि राजकीय अंगांचे तात्त्विक विवेचन करणारे निबंध लिहिले जाऊ लागले. गोवा मुक्तीनंतरची सहा वर्षे भाषिक वाद जोरावर असल्याने स्वाभाविकपणे 'मातृभाषा आणि स्वतंत्र राज्याची मागणी' या विषयांवरील लिखाणाला उधाण आले. त्याचे पडसाद सर्व जगभर उमटू लागले. या कालखंडातील कोंकणी साहित्यात अनेक प्रवाह आणि वळणे दिसत असली तरी गोंयकारांच्या स्वभावात आणि जीवनपद्धतीत मुरलेल्या काव्य-माध्यमाचा भरभरून वापर झाला.

'गोंयां तुज्या मोगाखातीर' (गोमंतका, तुझ्या प्रेमापोटी) ह्या मनोहरराय सरदेसाई (1925-2006) यांच्या काव्यसंग्रहाने कोंकणी काव्यास नवीन दिशा मिळाली. त्यांच्या या काव्यात मातृभूमीविषयीची अपार ओढ, तिचे सौंदर्य, तिचे माहात्म्य अतिशय भावपूर्ण भाषेत व्यक्त झालेले आहे. या संग्रहातील अधिकांश कविता ते पॅरीसमध्ये असताना लिहिलेल्या आहेत. त्या वाचताना भावसाधर्म्यामुळे सावरकरांच्या कवितेची आठवण झाल्याशिवाय राहत नाही. अतिशय साध्या आणि मधुर कोंकणीतील या काव्याने गोमंतकीयांची मने हलली आणि हिंदू आणि ख्रिश्चन या उभय धर्मातील गोंयकार, कोंकणी आणि गोंय यांच्या मोगाखातीर कधी नव्हे

इतके जवळ आले. एका नव्या मनूचा प्रारंभ झाला. त्यांच्या 'जायात जागें' या काव्यसंग्रहात स्वातंत्र्य मिळूनही गोंयकारांमध्ये दिसणारी गुलामगिरीची प्रवृत्ती व अज्ञान यांविषयींची सामाजिक जाणीव व्यक्त झालेली आहे.

गोंय आणि गोंयकारांच्या प्रेमाने भारलेले सरदेसाई आपल्या भारतीय परंपरेला विसरले नाहीत. 'रामगीते'मध्ये त्यांनी रामकथेला सुंदर काव्याचा साज चढविला आहे. त्यांच्या 'जायो-जुयो' या संग्रहात विचारांना नाजुक शब्दांचा सुरम्य घाट प्राप्त झाला आहे. प्रो.आर्मांदु मिनेजिश म्हणतात, ''फार काळ आम्ही अस्सल गोंयकार कवीची प्रतीक्षा करीत होतो; मनोहरांच्या रूपाने आम्हास तो प्राप्त झाला !''

बाकीबाब आणि मनोहरराय यांच्या पाठोपाठ एकाच वेळी 'आयलें तशें गायलें' 'म्हजें उत्तर गावड्याचें', 'उतरलें तें रूप धरतलें', 'धर्तरेचें कवन' आणि 'चंद्रावळ' अशा पाच काव्यसंग्रहांसह र.वि.पंडितांचा (1917-1990) झंझावात पुढे आला. त्यांच्या कवितेने पारंपारिक काव्याची सर्व बंधने तोडली व नव्या तालाने आणि नव्या शब्दकळेने ती लोकांसमोर आली. दलित आणि भूमिपुत्रांच्या दु:ख-वेदनांचे नग्न चित्रण त्यांच्या काव्यात आढळून येते.

बोरकरांची कविता पारंपारिक नाद, ताल आणि सूर घेऊन रसिकांस सामोरी जाते; सरदेसायांची कविता नवनवीन भावभावना व चित्तवेधक प्रतिमांचा साज लेऊन पदन्यास करते; तर पंडितांची कविता गोमंतकाच्या मातीचा गंध उधळीत सावेश प्रवेश करते.

पंडितांच्या काव्याचे सोळा भाषांतून अनुवाद झाल्याने कोंकणी साहित्य सर्व दूर ज्ञात झाले. विश्वभरातील अनेक साहित्यसंस्थांनी त्यांचा बहुमान केला. अनेक पारितोषिके प्रदान केली.

पांडुरंग भांगी (1923-) यांच्या काव्यात कलावंताचे आत्मपरीक्षण दिसून येते. आपल्या रेखीव शब्दांनी आणि कातीव पद्यरचनेने ते काव्याला अस्सल कोंकणी उभार आणतात. त्यांच्या 'दिश्टावो' या काव्यसंग्रहात व्यथित आत्म्याच्या सर्व दाबून टाकलेल्या आणि लपलेल्या भावभावनांचा उमाळा दृष्टीस येतो.

नागेश करमली (1933-) हे मूळचे केपें येथील. गोमंतकाच्या स्वातंत्र्य संग्रामात त्यांनी हिरीरीने भाग घेतला. त्यांचे 'जोरगत' आणि 'सांवार' हे दोन काव्यसंग्रह 1979 मध्ये प्रसिद्ध

झाले. त्यांच्या लेखनात जोष आणि दलितांविषयीची कणव विशेषत्वाने आढळते. शंकर भांडारी (1925-1987) यांच्या काव्यात गोडवा आहे; त्याचप्रमाणे सामाजिक व्यंगांवर नेमके बोट ठेवणारे निरीक्षण आहे. उदय भेंब्रो (1939-) यांनी कथा, कविता व नाटके लिहिली. यांच्या भावगीतांच्या ध्वनिमुद्रिका अतिशय लोकप्रिय आहेत.

'ओपिनियन पोल' नंतर गोमंतकातील राजकीय मतभेद निवळले व नव्या दमाच्या कवींचे पेवच फुटले. मंडळी तरुण असली तरी त्यांनी काव्याची तंत्रे चांगल्या प्रकारे हस्तगत केली आहेत. माधव बोरकार (1954-), प्रकाश पाडगांवकर (1945-), रमेश वेळुसकर (1947-), पुरुषोत्तम शिंगबाळ (1945-) या तरुण कवींच्या कवितेत भाव आणि विचारांना साद आहे. यांतील बोरकार यांचे 'चंवर', 'वताच्यो सांवळ्यो' 'उजवाडाचो रुख' हे काव्यसंग्रह; पाडगांवकरांचे 'उजावाडाची पावलां', 'वास्कोयन'; वेळुसकारांचे 'मोरपाखां' व 'माती' हे काव्यसंग्रह आणि 'मोनी व्यथा' ही कादंबरी विशेष लक्ष वेधून घेतात. शिंगबाळ हे कवी, संगीतज्ञ व विनोदी लेखक म्हणून ज्ञात आहेत. पुंडलिक नारायण नाईक (1952-) यांच्या लेखनास गोव्याच्या मातीचा वास येतो. त्यात शतकानुशतके पायदळी तुडविल्या गेलेल्या दलित जनांच्या आणि बहुजनांच्या आशा - आकांक्षांचे चित्रण आहे. 'गांवधनी गांवकार', 'चौरंग' हे एकांकिका संग्रह, 'अच्छेव', 'बांबर' या कादंबऱ्या; 'मुठय' हा कथासंग्रह, 'गा आमी राखणे' हा काव्यसंग्रह व 'रानसुंदरी' हे कथाकाव्य; त्याचप्रमाणे 'रक्तखेव' हे नाटक लिहून नाईकांनी आपल्या विविधरंगी प्रतिभेचा साक्षात्कार घडविला आहे.

स्वातंत्र्योत्तर कालखंडात साहित्यिक लेखनाबरोबरच साहित्यिक संशोधनात रममाण होणारे विद्वान म्हणून ओलिव्हिन्यु गोमिश (1943-) यांचा निर्देश करावा लागेल. प्रारंभी भारतीय प्रशासन सेवेत अधिकारी असलेले गोमिश आपल्या कोंकणी प्रेमापोटी साहित्याकडे वळले. कथा, कविता, प्रवास-वर्णन, अनुवाद अशा प्रकारचे चौफेर लेखन करून गोवा विद्यापीठाचे पहिले कोंकणीचे प्रोफेसर म्हणून आता ते स्थिरावले आहेत.

गोमिश यांनी कालिदासाच्या मेघदूताचा कोंकणीत पद्यरूप अनुवाद केला व शाकुंतलाची कथा कोंकणीत रुपांतरित केली. त्याचप्रमाणे जॉर्ज ऑर्वेलच्या Animal Farm ह्या कादंबरीचा 'मोनजाती घरभाट' व खलील जिब्रानच्या The Broken Wings चे 'तोडिल्लीं पाखां' या नावाने भाषांतरे केली. 'पुंजायिल्ल्यो पाकळ्यो', 'सुस्कारे' हे गोमिशांचे काव्यसंग्रह, 'डॉ.फ्रांसिस लुईश गोमिश' हे त्यांनी लिहिलेले चरित्र, 'मन वोडटा वोडना' हा त्यांचा कथासंग्रह आणि

'कोंकणी सरस्पतिचो इतिहास' हा कोंकणी साहित्याचा एकमेव इतिहास ही गोमिशांची पुस्तके खूप प्रसिद्ध आहेत. अलीकडे त्यांनी ब्राग येथील ग्रंथालयातील हस्तलिखीत स्वरूपात पडून असलेले सोळाव्या शतकांतील रोमन लिपीतील 'कोंकणी रामायण' संपादित करून फार मोलाची कामगिरी केली आहे.

चंद्रकांत केणी (1934-), दामोदर मावजो (1944-), शीला नाईक (1945-) मीना गायतोंडे (काकोडकर), सुरेश काकोडकर आणि पुंडलिक नारायण नाईक (1952-) हे स्वातंत्र्योत्तर काळातील समर्थ कथाकार होत. गोव्याच्या मातीत मुरलेल्या या तरूण कथाकारांच्या लेखनात गोंयकारांच्या जीवनातील वैशिष्टये अचूकपणे टिपली जातात. एवढेच नव्हे, तर मानवी जीवनाची सर्व अंगोपांगे कथाविषय होतात.

केणींच्या नावावर 'धर्तरी अजून जियेताली' 'आशाढ पांवळी', 'अळमी', 'भूंयचाफीं' हे कथासंग्रह आणि 'एकलो एकसुरो', 'तरे-तरेचीं संवंगां' ह्या लघुकादंबऱ्या आहेत. त्यांच्या साहित्यातून चौफेर निरीक्षणाचा प्रत्यय येतो; प्रादेशिक व वैश्विक कथावस्तू घेऊन जीवनाचे गूढ शोधण्याचा प्रयत्न दिसतो. कोंकणीचे प्रतिभावान लघुकथाकार म्हणून त्यांची ख्याती आहे.

दामोदर मावजो हे मूळचे माजोड्ड्याचे. यांचे 'गांथन' आणि 'जागरण' हे कथासंग्रह त्यांतील कलाकुसर आणि व्यक्तिचित्रण यांसाठी अद्वितीय होत. त्यांच्या लघुकथांतून साध्या व अनलंकृत शैलीत कथेचे वातावरण तयार करून पात्रांच्या मनात चाललेल्या खळबळीचे अचूक दर्शन घडविलेले आढळते. मावजोंच्या 'कार्मेलीन' या कादंबरीस 1983 चा साहित्य अकादमीचा पुरस्कार प्राप्त झाला. त्यांची 'एका खोमसाची काणी' आणि 'बाबुलो' ही लहान मुलांसाठी लिहिलेली पुस्तकेही खूप लोकप्रिय आहेत. प्रामाणिकता, जीवनातील प्रश्नांशी बांधिलकी आणि साधी व परिणामकारक शैली ही त्यांच्या लेखनाची वैशिष्ट्ये म्हणता येतील.

शीला नाईक कोळंबकार या कोंकणीच्या एक समर्थ लेखिका असून त्यांच्या 'ओली सांज' या कथासंग्रहाने गोवा कला अकादमीचा पुरस्कार प्राप्त केला. या संग्रहात आजूबाजूच्या जीवनाचे वस्तुनिष्ठ चित्रण आले आहे. त्यांच्या कथांत निसर्गाबद्दल वेड, परमानस प्रवेशाची किमया व सामाजिक जाणीव यांचे मधुर मिश्रण आढळून येते.

केणी, मावजो व शीला नाईक यांच्या लेखनातून कोंकणी लघुकथेला आशय आणि

आकार प्राप्त झाला. कर्नाटकांतील कथाकारांत फ्रांसीस सालदाना हे अग्रभागी असून त्यांचे चौदा कथासंग्रह प्रसिद्ध झाले आहेत.

कोंकणी बोलणारा सामान्य माणूस देखील भावुक आणि संवेदनशील असला तरी तो जगाकडे उपरोधाने पाहतो. तो मनाने कवी असला तरी त्याच्या व्यवहारात अवखळ उपहास असतो. त्याच्या स्वभावातील या परस्परविरोधी पैलूंचे सार्थ चित्रण दत्ताराम सुखठणकार (1924-2005) व अ.ना.म्हांबरो या विनोदी लेखकांच्या साहित्यात आढळून येते. रुढीप्रिय समाजाच्या मूर्ख आणि अडाणी चालीरीतींवर ते कडाडून हल्ला करतात. सुखठणकारांच्या साहित्यातील उनाडटप्पू, धोबी, वकील, डॉक्टर, घरकामे नोकर, मुंबईकर अशा अनेक गोंयकार मंडळींची व्यक्तिचित्रे कधीही विसरली जाणार नाहीत. त्यांच्या 'मान्नी पुनव' या विनोदी लेखसंग्रहास साहित्य अकादमीचा पुरस्कार प्राप्त झाला.

अ. ना. म्हांबरो (1938-) यांच्या साहित्यात मानवी स्वभावाचे विनोदी पैलू घरगुती भाषेत व्यक्त होतात. सुशिक्षितांच्या मूर्खपणाचे आणि भंपकपणाचे बिडंबन त्यात जागोजागी विखुरलेले आढळते. त्यांच्या 'गोंयची अस्मिताय' या पुस्तकात गोव्यातील दोतोर, इजनेर, प्रोफसोर, फुडारी, येंप्रेगाद इ. मंडळींची चित्रणे इतक्या सफाईने केली आहेत की गोंयकारांना ते आरशाप्रमाणे वाटावे. 'पणजी आतां म्हातारी जाल्या' या त्यांच्या पुस्तकातही असेच सामाजिक विडंबन आढळून येते. म्हांबरो यांच्या 'घुमचे कटर घुम' या बालगीत–संग्रहात विनोद आणि कोट्या यांची रेलचेल आहे.

रामकृष्ण जुवारकर, काशिनाथ लोलयेंकार, दिनकर देसाई, सिरिल सिक्वेरा, फ्रांसीस सालडाना स. कोंकणी साहित्यिकांनीही उदंड विनोदी लेखन करून गोंयकारांना खदखदून हसत ठेवले आहे. कोंकणी साहित्यकारांत रवींद्र केळेकारांच्या तोडीचा निबंधकार झाला नाही. निबंध, कथा, प्रवासवर्णने, रोजनिशी आणि पत्रे अशा विविध प्रकारच्या गद्य साहित्याचा त्यांनी पाऊस पाडला आहे. त्यांचे साहित्य मानवाच्या विश्वातील स्थानाचा शोध घेते. उत्तम नागरिकाची कर्तव्ये विशद करते. सामाजिक, सांस्कृतिक, राजकीय कार्यात आकंठ बुडून देखील ज्या विषयास ते लेखणीचा स्पर्श करतात तो विषय तत्त्वचिंतनात न्हाऊन निघतो. समाजशास्त्र, भाषाशास्त्र, इतिहास, शिक्षणशास्त्र, राजकीय तत्त्वज्ञान, विज्ञान असे मानवी समाजाच्या व्यवहाराचे अनेक विषय त्यांनी समर्थपणे हाताळले आहेत. त्यांनी कोंकणीच्या विकासाची काळजी वाहिली; तशीच गोंयकारांची अस्मिता चेताविली व कोंकणीचा आवाज बुलंद केला.

त्यांच्या गद्यात सरलता असते; सुबोधता असते; कठोर तार्किकता व मौलिकता असते.

'नवी शाळा' (शिक्षण), 'अशे आशिल्ले गांधीजी' (गांधीजींच्या आख्यायिका), 'कथा आनी काणियो', 'तुळशी' (कादंबरिका), वेळेवयल्यो घुलो' (रोजनिशी), 'भजनगोविन्दम-एक मनन' (तत्त्वज्ञान), 'भौ-भाशीक भारतांत भाशेचें समाजशास्त्र', 'उजवाडाचे सूर' (ललित निबंध), 'जपानांतली आनंदयात्रा', 'हिमालयांत', 'सांगाती' (प्रवास वर्णन व चिंतन), 'ब्रह्माडांचें तांडव' (खगोलशास्त्र) अशा विविध प्रकारच्या केळेकारांच्या साहित्यातून विश्वाचे सातत्याने निरीक्षण करणारे व त्यात बौद्धिक आणि नैतिक आनंद शोधणारे चिंतनशील समीक्षकाचे मन सामोरे येते. अलीकडे, महाभारताची कथा कोंकणीत अनुवादित करून (दोन खंड) त्यांनी आपल्या सांस्कृतिक अनुसर्जनाची सांगता केली आहे.

गोव्यात विदग्ध आणि लोकनाट्य अशा दोन्ही प्रकारच्या रंगभूमीची दीर्घ परंपरा आहे. गोव्यातील कॅथॉलिक समाज 'तियात्र' नावाची नाटके-प्रहसने करतात. साध्या बांधणीची व निर्व्याज संवादांनी नटलेली ही नाटके नीती आणि कडवट उपहास यांनी परिप्लुत असतात. समाजाच्या सर्व स्तरांवरील प्रेक्षकांची ती निर्भेळ करमणूक करतात.

एकोणीसशे पन्नासच्या आसपास मुंबईमध्ये आंतरमहाविद्यालयीन स्पर्धांतून कोंकणी एकांकिकांचा उगम झाला. रघुवीर नेवरेकार, किसन कामत, भिकू पै आंगले इत्यादींनी आपल्या एकांकिकांनी नाट्य आणि अभिनय या दोन्ही अंगांची जोपासना करून लोकशिक्षण व करमणूक केली. यापूर्वी शणै गोंयबाब वालावलीकरांनी मोलियरच्या नाटकांचा 'मोगाचें लग्न' व 'पवनाचें तपलें' या नावांनी कोंकणीत अनुवाद केला होता. त्यांचे 'झिलबा राणो' हे मौलिक नाटक होय. ते अरेबियन नाईट्स मधील कथानकावर आधारलेले होते.

वालावलीकरांनंर रामचंद्र शंकर नाईक (1893-1960) हे प्रतिभावान नाटककार होऊन गेले. मूळ म्हाड्डोळ येथील हे नाईक पणजीच्या इश्कोल नॉर्मालमध्ये प्रोफ़ेसर होते. त्यांची 'चवथीचो चंद्र' ही नाटिका फार गाजली. त्यांनी 'दामू कुराडो', 'एक हजार आनी तेईस', 'म्हाराज', 'रायबाऱ्याची व्हाड्डीक', 'म्हजो सर्गार आशिल्लो घरकार' अशा एकाहून एक सरस एकांकिका लिहून कोंकणी रंगभूमीचा पाया घातला. पुंडलिक दांडो हेही असेच एक यशस्वी नाटककार होत. त्यांचे 'ताची करामत' हे विनोदी नाटक प्रथम रंगभूमीवर आले. त्यानंतर 'निमित्ताक कांरण' या नावाची शोकान्तिका लिहून कोंकणी रंगभूमीचे अंगभूत सामर्थ्य सिद्ध

केले. गोव्यास स्वातंत्र्य मिळाल्यानंतर विनय सुर्लकार, चंद्रकान्त पार्सेकार, रामकृष्ण जुवारकार, एन्. शिवदास, दिलीप बोरकार इ. तरुण नाटककारांनी नाटके-नाटिका लिहून कोंकणी रंगभूमीची परंपरा जीवित ठेवली. परंतु अजूनही या रंगभूमीवर महान प्रतिभेचा नाटककार जन्मास यावयाचा आहे. तियात्र नाटिकांच्या बाबतीतही असेच म्हणता येईल.

कोंकणीतील पहिले नियतकालिक 2 फेब्रुवारी 1889 मध्ये सुरु झाले. प्रारंभी 'उदेंतेचे साळक' हे मासिक स्वरूपातील हे पत्र पुढे पाक्षिक स्वरूपात निघू लागले. कोंकणीतील पहिले दैनिक 'सांजेचें नेकेत्र' हे 1907 पासून मुंबई येथून निघू लागले. 1914 मध्ये 'रोटी' नावाचे मासिक कराचीमधून निघू लागले. यानंतर 'आव्हे मारीया' (1919) 'द गोआ मेल' (1919) 'द गोआ टायम्स' (1930), 'वावराड्यांचो इश्ट' (1933), 'उदेंतेचें नेकेत्र' (1946) इ. नियतकालिके प्रसिद्ध होऊ लागली. ठिकठिकाणांहून निघणाऱ्या या पत्रांनी कोंकणीच्या प्रमाणीकरणाचा पाया घातला, कोंकणीची अस्मिता जागवली व कोंकणीतील साहित्य-निर्मितीस खतपाणी घातले. स्वातंत्र्योत्तर काळात कोंकणी वृत्तपत्रांचे नवीन युग सुरु झाले. या वृत्तपत्रांनी नवस्वातंत्र्याचे स्वागत करून अन्याय व विषमतेविरुद्ध जोरदार आवाज उठवला. यांत चंद्रकान्त केणी, उदय भेंब्रे, फेलीसियु कार्दोजो, एवाग्रिओ जॉर्ज, गुरुनाथ केळेकार, यशवंत पालेकार हे अग्रेसर होत. त्यांनी 'त्रिवेणी', 'कोंकणी', 'गोंयचो साद', 'दिवटी', 'सोत' 'उजवाड', 'कोंकण-भारती' या नियतकालिकांचे संपादन केले. याच कालखंडात 'नवें गोंय', 'अपुरबाय', 'पर्मळ', 'पुनव', 'पारजात' इ. नवी नियतकालिके प्रसिद्ध होऊ लागली.

गोवा मुक्तीनंतरचे कोंकणी साहित्य हा जागतिक वाङ्मयातील एक अपूर्व चमत्कार आहे. स्वातंत्र्याचा प्राणवायू आणि अस्मितेचे खतपाणी पिऊन परिपुष्ट झालेल्या प्रतिभेचा आणि प्रज्ञेचा तो स्वाभाविक आविष्कार आहे. ज्ञानदेवांच्या शब्दांत सांगायचे तर,

*''इवलेंसें रोप लावियेलें द्वारीं ।*
*त्याचा वेलु गेला गगनावेरी ।।*
*मोगरा फुलला मोगरा फुलला ।*
*फुलें वेचितां अतिबारु कळियांसि आला ।।''*





प्रकरण सोळावे

# कोंकणीच्या विकासाची दिशा

## अस्मितेची समस्या

कोणतीही भाषा स्वयंगुणाने श्रेष्ठ वा कनिष्ठ अशी नसते. आपल्या भाषिक समाजाच्या दैनंदिन गरजा भागविण्यास ती पूर्णपणे समर्थ असते. भाषिक समाजाच्या गरजा वाढल्या की शब्दसंग्रह वाढतो; संरचना मात्र कायम राहते. वाढत्या गरजा भागविण्यासाठी ती पुष्ट बनते. नवनवीन कल्पना आणि संकल्पना व्यक्त करण्यासाठी ती परपुष्टही बनते. कोंकणीची समस्या ही तिच्या सामर्थ्याची समस्या नाही. ती तिच्या मराठीपासूनच्या भिन्नत्वाचीही नाही. इतिहासाने हे भिन्नत्व सिद्ध केलेले आहे. खरी समस्या आहे ती गोमंतकीयांच्या अस्मितेची.

कोणताही भाषिक समाज हा एकजिनसी असा नसतो. नाना ठिकाणची लोकर पिंजून, खळ लावून, लाटून, दाबून, बुरणूस तयार होतो; त्याचप्रमाणे भौगोलिक, ऐतिहासिक, राजकीय, आर्थिक, धार्मिक, सांस्कृतिक अशा अनेकविध कारणांनी एकत्र आलेले जनसमूह परस्पर सहकार्याच्या हेतूने समान भाषिक संकेत वापरू लागतात आणि भाषिक समाज तयार होतो. कोंकणीचा भाषिक समाज मुंबईपासून कोचीनपर्यंत पसरलेला आहे. त्यांतील फार तर निम्मा भाषिक समाज गोमंतकात असेल. असे असले तरी ते त्यांचे सांस्कृतिक केंद्र आहे, स्फूर्तिस्थान आहे. जलाशयात दगड टाकल्यावर त्यायोगे उत्पन्न होणाऱ्या लाटा ज्याप्रमाणे सर्वदूर पसरत जातात; त्याप्रमाणे गोमंतकाने घेतलेल्या निर्णयांची प्रतिक्रिया सर्व कोंकणीभाषी प्रदेशांत उमटत असते.

गोमंतकाची समस्या भाषेची नाही. भाषा हे एक निमित्त आहे. ऐतिहासिक, सांस्कृतिक, भौगोलिक व भाषिक कारणांनी एखाद्या प्रदेशालाही विशिष्टता, पृथगात्मता व स्वतंत्र व्यक्तिमत्त्व

प्राप्त होत असते. गोमंतकाच्या दोन-अडीच हजार वर्षांच्या राजकीय इतिहासाचे अवलोकन केल्यास गोमंतकीयांचे अनुबंध महाराष्ट्रीयांशी क्वचितच जुळलेले दिसतील. साडेचारशे वर्षांच्या फिरंगी राजवटीने गोमंतकास अन्य राजकीय प्रवाहांपासून पूर्णपणे वेगळे ठेवले. गोमंतकीयांना जुलूम-जबरदस्तीने युरोपातील कॅथॉलिक संस्कृतीमध्ये ओढण्याचा प्रयत्न केला. जुन्या काबिजादीतील बहुसंख्य प्रजा बाटवून ख्रिस्ती केली. नवख्रिस्त्यांचा हा समाजगट तीनचार शतके आपल्या मूळ प्रवाहापासून वेगळा वाहत राहिला.युरोपियनांच्या भौतिक श्रेष्ठतेस भाळून 'काळासाहेब' म्हणून मिरविण्यास त्यास सुख वाटू लागले. परंतु पोर्तुगीज काय, फ्रेंच काय किंवा इंग्रज काय, त्यांनी एतद्देशीय प्रजेस आपले असे कधीच म्हटले नाही. आजही दक्षिण आफ्रिकेतील गोऱ्यांची मुजोरी या प्रवृत्तीची साक्ष देत आहे.

फिरंग्यांची हकालपट्टी झाल्यावर गोमंतकीय ख्रिस्ती समाजाचे युरोपीय संस्कृतीशी असलेले अनुबंध पार उध्वस्त झाले. धड युरोपीय नाही व धड भारतीय नाही, अशी त्रिशंकूची अवस्था त्यांस प्राप्त झाली. साहजिकच आपले वेगळेपण दर्शविण्याची या समाजाची धडपड चालू आहे. कोंकणीचा पुरस्कार हा त्या धडपडीचाच एक भाग आहे. कोंकणीचे अनुबंध हिंदू, ख्रिस्ती, मुस्लिम अशा सर्व धर्मियांस एकत्र आणू शकले. कोंकणी भाषेची प्रतिष्ठा वाढली. तिच्यात साहित्यनिर्मिती होऊ लागली. साहित्यिक भाषा म्हणून तिला मान्यता प्राप्त झाली. राजभाषा म्हणूनही प्रतिष्ठापना झाली.

कोंकणीची व अनुषंगाने गोमंतकाची होणारी आगेकूच काही असंतुष्ट आत्म्यांना मान्य नाही. त्यांचे राजकीय डावपेच चालू झाले आहेत. कोंकणीसाठी रोमन लिपीचा वापर व मराठीला दुय्यम राजभाषा म्हणून मान्यता या दोन्ही मागण्या या डावपेचांचाच भाग आहेत.

वस्तुत: फिरंग्यांच्या आगमनापूर्वी कोंकणी भाषा प्रदेश-परत्वे नागरी, कन्नड, मोडी, मल्याळम या लिपींत लिहिली जात होती. मुद्रणाच्या सोयीसाठी व पृथगत्व दर्शविण्याच्या हेतूने मिशनऱ्यांनी रोमन लिपीचा अंगिकार केला. उदंड असे धार्मिक साहित्य निर्माण केले आणि रोमन लिपीत छापून काढले. रोमन लिपीतील कोंकणी मजकूर वाचताना आपण पोर्तुगीज किंवा इंग्रजी वाचतो आहोत व आपण कोणी 'साहेब' आहोत असा आभास निर्माण करणे नवख्रिस्त्यांना शक्य झाले. पण गोमंतकातील ख्रिस्ती बांधवांना आपण रोमन लिपीमुळे प्रचंड अशा जनप्रवाहापासून वेगळे पडत आहोंत याची आज जाणीव झाली आहे. रोमन लिपीतील तुटपुंजा मजूकर वाचून ज्ञान मिळविणे व अन्य समाजांशी स्पर्धा करणे केवळ अशक्य आहे, हे त्यांना

कळले आहे. मुद्रणसोय व शीघ्रलेखन या दृष्टींनी रोमन लिपी ही नागरी लिपीपेक्षा सोयीची आहे हे निर्विवाद. परंतु त्यासाठी ध्वनी व लेखचिन्ह यांमध्ये एकास एक असा सुसंवाद साधावा लागतो. कोंकणीचे रोमन लिप्यंकन मूलत: पोर्तुगीज लिपीवर आधारलेले असल्याने त्यामध्ये ध्वनींचे सुसंबद्ध प्रतिबिंब उमटत नाही व स्पेलिंगच्या नाना परी उद्‌भवतात. भाषेप्रमाणे लिपी हा ही एक सामाजिक वारसा आहे. यामुळे भारतीय लोक आपापल्या भाषा व लिपी यांवर अतोनात प्रेम करतात. आपल्या लिपी टाकून रोमन लिपीचा अंगिकार ते सुतराम करणार नाहीत. अशा परिस्थितीत मूठभर लोकांनी कोंकणीसाठी रोमन लिपीचा पुरस्कार करणे म्हणजे आपल्या पायावर धोंडा पाडून घेण्यासारखे आहे. त्यांत व्यावहारिक दूरदृष्टी नाही. गोमंतकाच्या निर्मितीपासून कोंकणीच्या झेंड्याखाली हिंदू, ख्रिश्चन व मुस्लिम कधी नव्हे इतक्या एकोप्याने एकत्र आले आहेत. 'बहूनामप्यसाराणां संहति: कार्यसाधिका' हे तत्त्व ध्यानात घेऊन गोमंतकाच्या उत्कर्षासाठी झटणे हे त्यांच्या हिताचे आहे.

गोमंतकाने मराठीला संगत-राजभाषेचा दर्जा देणे म्हणजे मागील दाराने मराठी-कोंकणी वादाला पुन्हा प्रवेश देणे होय. 1960 साली महाराष्ट्र राज्याची स्थापना झाली. 1966 पासून मराठीला राजभाषेचा दर्जा देऊन सर्व शासकीय कामकाजासाठी तिचा वापर व्हावा अशी कायद्याने तरतूद झाली. पण आज कोणते दृश्य दिसत आहे ? इतकी वर्षे लोटूनही महाराष्ट्रातील निम्म्याहून अधिक जनता निरक्षर आहे. एकाही विद्यापीठात सर्व विषयांसाठी मराठी भाषा उच्चशिक्षणाचे माध्यम म्हणून वापरली जात नाही. शासकीय व्यवहारातील मराठीची अवस्था तर भयानक आहे. येथील मुख्यमंत्री प्रांजलपणे कबूल करतात की मराठीतील प्रशासकीय टिपणे आपल्याला समजत नाहीत. त्यातील विनोदाचा भाग सोडला तरी त्यापाठीमागे दडलेल्या विदारक वस्तुस्थितीचा गंभीरपणे विचार करण्याची वेळ आलेली आहे. अशा परिस्थितीत मराठीकडे लोभसपणे पाहण्यात गोमंतकाचे कोणतेही हित नाही. गोमंतकाने भाषिक नियोजनाद्वारे कोंकणीचा दर्जा व तिची उपयुक्तता वाढीस कशी लागेल याचाच विचार करणे सद्य:स्थितीत आवश्यक आहे.

"मनशाचें उलोवप हें ताच्या आत्म्याचें भायलें, उक्तें रूप आसता, तशीच एकाद्र्या जनसमाजाची भास ही ताच्या समष्टिरूप आत्म्याचें भायलें आनी वयर दिसणें रूप आसता. ज्या जनसमाजाक स्व-भास नासता तो समाज सगळ्या गजालींनी आत्महीण जाता."

(अज्ञात लेखक)

(माणसाचे बोलणे हे त्याच्या आत्म्याचे बाह्य, उघडे रूप असते. त्याचप्रमाणे एखाद्या जनसमाजाची भाषा ही त्याच्या समष्टिरूप आत्म्याचे बाह्य आणि वरती दिसणारे रूप असते. ज्या जनसमाजाला स्वभाषा नसते तो समाज सर्व बाबतींत आत्महीन बनतो.)

**कोंकणीच्या विकासाची दिशा :**

कोंकणीला राजभाषा म्हणून मान्यता दिल्यापासून गोमंतकातील शासक आणि कोंकणीभाषी विद्वान यांच्यावर अननुभूत अशी जबाबदारी येऊन पडली आहे. भाषेचा विकास हा अन्य सर्व क्षेत्रांतील विकासाचा पाया होय. विकास म्हटला की, नियोजन हे आलेच. नियोजन म्हटले की उद्दिष्टे आलीच. ही उद्दिष्टे ठरविणे, विकासाची दिशा व कालावधी निश्चित करणे, नियोजनाचा आराखडा ठरवून कार्यवाहीला जुंपून घेणे या गोष्टी मोठ्या तातडीने व्हावयास पाहिजेत. आपसांतील मतभेद विसरून गोमंतकातील शासनकर्ते आणि गोमंतकीय विद्वान यांनी हे आव्हान स्वीकारले नाही, तर दारी आलेल्या लक्ष्मीला घरात न घेतल्यासारखे होईल.

भाषिक नियोजन दोन आघाड्यांवर करावे लागेल. एक आघाडी प्रौढांची व दुसरी बालकांची. कोणतेही बालक कोणतीही भाषा वयाच्या चार वर्षांपर्यंत सहजपणे आत्मसात करते. त्याच्या कुटुंबात आणि परिसरात बोलली जाणारी भाषा हीच त्याची मातृभाषा होय. मातृभाषेचे व्याकरण न शिकवता आत्मसात करण्याची बौद्धिक शक्ती निसर्गाने त्यास बहाल केलेली असते. पौगंडावस्था प्राप्त होण्याच्या काळापर्यंत त्याच्या मेंदूच्या पेशींची वाढ झपाट्याने होत असल्याने चार ते सोळा वर्षे हा खरा भाषासंपादनाचा काळ होय. त्यानंतरचा सर्व आयुष्याचा भाग हा भाषाउपयोजनाचा होय. त्यामुळे बालकांसाठी करावयाचे भाषिक नियोजन शासनाला तातडीने हाती घ्यावे लागेल.

या नियोजनाची पहिली पायरी म्हणजे सर्व माध्यमांच्या प्राथमिक व माध्यमिक शाळांतून कोंकणीचे अध्ययन-अध्यापन एक अनिवार्य विषय म्हणून जारी करणे. यासाठी शिक्षक व पाठ्यपुस्तके यांची मोठ्या प्रमाणावर गरज भासेल. कोंकणी भाषेचे शिक्षक मिळणे कठीण नाही. गोमंतकाबाहेर सुशिक्षित कोंकणी भाषकांची वाण नाही. प्रलोभन आणि प्रोत्साहन देऊन त्यांचा ओघ गोमंतकाकडे वळविता येईल. कोंकणी भाषा, इतिहास, संस्कृती, समाज यांचे अभ्यासक मिळवून त्यांस उच्च शिक्षणाच्या क्षेत्रात कामास लावणे हेही करावे लागेल.

बालकांच्या भाषिक विकासासाठी कोंकणी पाठ्यपुस्तकांची आवश्यकता राहणारच. त्या दिशेने प्रयत्न सुरूही असतील. परंतु याशिवाय अन्य पुस्तकांची, विशेषत: कथा-कादंबऱ्या-चरित्रे यांसारख्या बालसाहित्याची बालकांना अतिशय आवश्यकता असते. त्यांच्यायोगे भाषिक कौशल्यांचे स्थिरीकरण होते व विचारांची प्रगल्भता वाढून अभिव्यक्ती सुधारते. पुढील दहा वर्षांत एक हजार इतकी बालकांसाठी पुस्तके काढण्याचे लक्ष्य गाठणे कठीण नाही. यासाठी शासनाला 'अनुवाद ब्यूरो' उघडावा लागेल व सिद्धहस्त लेखकांस अशा पुस्तकांची निर्मिती करण्यास आवाहन करावे लागेल. 'एका पुस्तकास दहा हजार रुपये' अशी योजना आखल्यास कोंकणी बालवाङ्मयाचा पाऊस पडेल !

प्रौढांचे भाषिक नियोजन हे भाषाभिवृद्धीपेक्षा व्यावहारिक उपयोजनाच्या दिशेने मार्गस्थ करावे लागेल. यासाठी प्रशासन आणि उच्चज्ञान-संपादन ह्या दोन क्षेत्रांत कार्याची अपेक्षा करावी लागेल. उच्चज्ञान-संपादनाच्या वाटेस सध्या जाऊ नये. नवीन पिढी महाविद्यालयात प्रवेश घेईपर्यंतच्या दहा वर्षांत विविध विषयांच्या परिभाषा तयार करणे, पाठ्यपुस्तके, कोश, व्याकरणे तयार करणे, वैचारिक ग्रंथलेखनास प्रोत्साहन देणे, साहित्यिकांचा सन्मान करणे अशासारखी दीर्घ मेहनतीची व मंदगतीने चालणारी कामे करावी.

प्रशासनिक व्यवहाराच्या भाषेचे एकसूत्रीकरण ही युद्ध पातळीवर हाती घेण्याची बाब होय. यासाठी पदनाम कोश, शासन-व्यवहार कोश, प्रशासनिक लेखनाचे विषयवार नमुने, सामान्य कायद्यांचे कोंकणी अनुवाद, विविध विषयाच्या परिभाषा यांची निर्मिती करावी लागेल. याशिवाय विशिष्ट पातळीपर्यंतचा शासनव्यवहार कोंकणीमध्येच होईल असे बंधन घालून त्याचे कटाक्षाने पालन करावे लागेल.

कोंकणीच्या भाषिक नियोजनात सर्वांत मोठी अडचण म्हणजे कोंकणीचे आवश्यक तितके प्रमाणीकरण झालेले नाही ही होय. भाषेचे प्रमाणीकरण ही एक दीर्घकालीन प्रक्रिया होय. कायद्याच्या बडग्याने साध्य होणारी ही गोष्ट नव्हे. यासाठी विद्वान, भाषा-प्रचारक, भाषावैज्ञानिक, राजकारण-मुत्सद्दी, समाजसेवक यांची एक सर्वसमावेशक समिती नेमून कोंकणीचे मानक व्याकरण व मानक कोश बनवून घ्यावेत. हे काम मोठ्या कष्टाचे पण चातुर्याचे असते. प्रारंभी उत्साह दाखविणारी मंडळी हळूहळू अशा कामातून काढता पाय घेतात व सर्व काम मोजके विद्वान व शासनाचे प्रतिनिधी यांनाच पार पाडावे लागते. परंतु चळवळ्या व राजकारणी लोकांची औपचारिक मान्यता अशा कार्यास आवश्यक असते.

कोंकणीचा बृहत्कोश, कोंकणी भाषेतील विश्वकोश, कोंकणी बोलींचे सर्वेक्षण, रामायण-महाभारतादी राष्ट्रीय ग्रंथांचे कोंकणी अनुवाद, विशाल गोमंतकाचा इतिहास, ज्ञाती व समाज यांचे सर्वेक्षण, कोंकणी साहित्याचा इतिहास, निवडक ख्रिस्ती वाङ्मयाचे देवनागरीकरण, गीता, बायबल, कुराण यांचे सुरस कोंकणी अनुवाद, कोंकणी लोकसाहित्याचे संकलन इत्यादी दीर्घकालीन प्रकल्पांचा प्रारंभ आतापासून करता येईल.

गोमंतकाचा इतिहास, कोंकणी भाषा व साहित्य, गोमंतकाच्या लोककला इत्यादी मानव्य विषयांवर चर्चा, परिसंवाद, परिषदा शासकीय खर्चाने भरवून कोंकणीची हवा निर्माण करणे आवश्यक आहे. अशा विचारमंथनातूनच कधीकधी नवे विचार व मार्गदर्शन लाभत असते. विरोधही निवळतो. या सर्व कार्यासाठी निधी हा लागणारच. हिंदी भाषेच्या विकासासाठी आणि प्रचारासाठी अब्जावधी रुपये उधळणाऱ्या केंद्रशासनाने अन्य भाषांच्या विकासासाठीही निधी उपलब्ध करून देणे हे त्यांचे कर्तव्य होय. असा निधी मिळविणे हे काम राजनीतिधुरंधरांचे आहे. त्याचा सदुपयोग करणे हे कोंकणी विद्वानांचे व प्रशासनाचे काम होय.

गोमंतकीय समाजाचे स्थूलमानाने तीन गट कल्पिता येतात. पहिला सारस्वतादी सुशिक्षित हिंदूंचा, दुसरा अल्पशिक्षित 'बहुजन' हिंदूंचा व तिसरा ख्रिश्चन आणि मुस्लिमांचा. या सर्वांचीच मातृभाषा कोंकणी आहे. यांतील पहिल्या दोन गटांस मराठीचेही ज्ञान आहे. काही सारस्वतांस कन्नडचे, काही ख्रिश्चनांस इंग्रजीचे तर काही मुस्लिमांस उर्दूचे बऱ्यापैकी ज्ञान आहे. हिंदी सर्वांनाच समजते; परंतु संभाषण-लेखनातील गती फारच थोड्यांना आहे. काहींना संस्कृतचे, तर काहींना पोर्तुगीजचे ज्ञानही आहे. भाषिक वितरणाच्या या विविध अंगांचा उपयोग काही धूर्त राजकारणी मंडळी आपले राजकीय स्वार्थ साधण्यासाठी करून घेतात. यांत नवीन असे काही नाही, हे सर्वत्रच चालते. विशेषत: भाषिक तत्त्वावर राज्यांची निर्मिती झाल्यापासून भाषाकारण हे राजकारणाचे एक उपकरण बनले आहे.

महाराष्ट्रातील राजकारणात लोकसंख्येच्या आधारावर बहुजन समाज अग्रेसर आहे. गोमंतकातील बहुजन समाजही लोकसंख्येच्या दृष्टीने अन्य समाजांशी तुल्यबळ असून त्याचे राजकारणात मोठे वजन आहे. मराठी भाषेचा पुरस्कार याच सामाजिक गटातून अधिक प्रमाणात होत आहे, याचे मूळ सत्तेचे राजकारण होय. वस्तुत: काही मोजकी मंडळी सोडली तर मराठी भाषेत यांस फारशी गती आहे असे नव्हे. सारस्वतादी मंडळींना कोंकणी व मराठी भाषांत सारखीच गती असूनही कोंकणी भाषेच्या व गोमंतकाच्या 'मोगा'पाठी त्यांनी आपली शिंगे

मोडून टाकली आहेत. रोमन लिपीचा अट्टाहास मोडीत काढून ख्रिस्ती समाजानेही मोठेच दूरदर्शित्व दाखविले आहे.

भौगोलिक, भाषिक आणि ऐतिहासिक कारणांनी गोमंतकाच्या संस्कृतीला व सभ्यतेला महाराष्ट्रीय संस्कृती व सभ्यतेहून वेगळा घाट प्राप्त झाला आहे. हा घाट, ही प्रतिभा, हे व्यक्तिमत्त्व गोमंतक टिकविणार की मराठीच्या महाप्रवाहात मिसळून घालवून बसणार हा खरा प्रश्न आहे. हिंदीच्या मोठ्या गाठोड्यातून सुटून एकामागून एक स्वतंत्र राज्ये स्थापित झाली व होत आहेत. काही गोमंतकीयांना मराठीच्या बोचक्यात शिरण्याची हौस का होते हेच कळत नाही. मराठी ही कोंकणीहून निश्चितच फार प्रगत अशी भाषा आहे. म्हणून मराठीच्या ज्ञानाचा फायदा कोंकणीच्या विकासासाठी करून घेता येईल. आडलेपडले म्हणजे शेजारणीकडे धाव घ्यावी तशी मराठीकडे धाव घेता येईल. संस्कृत आणि हिंदीकडेही घेता येईल. कोंकणीचा पुरस्कार म्हणजे मराठीचा तिरस्कार नव्हे. शतकानुशतके दबलेल्या समाजजीवनाचा तो एक हुंकार आहे. मुंबईपासून कोचीनपर्यंत पसरलेल्या एका पुरातन संस्कृतीचा जयजयकार आहे.



परिशिष्ट

# कोंकणी बोलींचे नमुने

## ग्रांथिक कोंकणी (प्राचीन)

गुरु – तूं क्रिस्ताव् ?

सिसु – होय परपेस्पराचे क्रुपेन.

गुरु – क्रिस्ताव् म्हणजे कितें ?

सिसु – क्रिस्ताव् म्हणजे, जो कोणु जेजु क्रिस्ताचें शास्त्र सुमुर्ति सत्यमानिता, आणी उचारिता तो.

गुरु – सत्यमानिता, आणी उचारिता, ऐसें म्हणतासि कित्या ?

सिसु – कित्या भावार्थिआ क्रिस्तावान, जेजु क्रिस्तांची फे सत्यमानुची, तैसिचि, जरि येकादे वेळो ति मुखीं उचारुंचि जाइत, तरि तिचे खातिर मरण पावलोइ तरि, मुखीं उचरुंची.

गुरु – माणुसु क्रिस्तावं जाल्या निमितिं कोणु मानु, कोणि व्हडिव ताका जोडता ?

सिसु – परमेस्पराचो धर्म पुत्रु होउनु स्वर्गींचो डाइजी जाता.

गुरु – आणी क्रिस्ताव् न्होय् तो ?

सिसु – हो ऐसलो सैतानाचो गुलामु, आणी स्वर्गिच्या डाइजाक चुकता.

(दौत्रीन क्रिश्तां. इ. स. 1622)



## कैसा क्रिस्त तारकासि क्रुसीं जडिला

मग हातु घालोनि जेसुवरि। वस्त्रें हिरविती शेस्त्रधारी।
रौद्र आटोनि आंगासरी। जोडली लुगडीं।।
जंव वस्त्रे काडिती दूत। तंव आंगीं पुणती पाजरे रक्त।
नवी वेथा प्रवर्तत। सर्वांगाथें।।
तंव तो स्वामी करुणाकरु। आपुलेआ रक्तमांशाचा उधारु।
वस्त्रेवीण राहे स्थिरु। जनभारांमाजि।।
दिसे सर्वांगीं लोहित वर्नु। सर्व शेरिरीं रक्त भरुनु।
तळवांवेरि मस्तकीं होउनु। घाइवटु जाहाला।।
तंव दुतीं धरोनि जेसुसि। उताणा घातला क्रुसीं।
येरु हातपाये सरसावी आपेसीं। आपुले आपण।।
तंव खिळा तुतिया घेउनि करीं। येकु दूतु पातला फुडारीं।
जेसुचा येकु तळथु येके छिद्रीं। जोडावेया।।
येक धरिती तेयाचे पाये हात। तंव तो दूतु वेगु करित।
सत्राणे खिळा मारोनि टोपित। जेसुचा तळथु।।
तेणें मांशे सिरा संदी तुंटती। रक्ताचेआ चिपुळिया उसळती।
वेदन भरली अद्भुति। जेसु धाया मोकळी।।
तुतियाचे नाद स्वामिणि आइकत। तिडकी ह्रदयासि येंत।
फाराप्रति वेदन चडत। जिव्हारीं तियेचां।।
वरुसकाळीं मेघमंडळ। तैसें जाहालें मुखकमळ।
पुत्रसोखाचे येंती उल्हाळ। दुखसाघरीं बुडाली।।
येक तळथु क्रुसीं जडिला।
तंव दुसरा खिळा आणिला।
दुसरा तळथु टोपिला। दुणावली वेदन।।

मग आणिकु दिर्घु खिळा घेउनि। दोग दूत आले टांकोनि।
चरणावरि चरण ठेउनि। येकें त्राटोनि धरिला ।।
दुसरा दूतु खिळा मारी। दोनि पाये जडिले क्रुसासरी।
दुखि जाहाली केवडी थोरि। ति जेसुचि जाणे ।।
यापरी कणिवाळु देवनंदनु। करचरणी क्रुसीं जोडुनु।
रौद्रभरित क्रुसु होउनु। रक्त सोखी वसुंधरि ।।
मग दूत शेरअधर उठिती। हाक सिहाडे करिती।
क्रुसु उचलोनि मूळ बैसविती। फोंडाआंतु ।।
तंव आंगिचा भारु येकवटताये। करचरणांचे विस्तारती घाये।
जेसु जगजिवनु मिरवताये। सकळां वरुता ।।
चौकडां असुध झरी। लोटुनि पडती धरणीवरि।
तेणें रक्तें पातकांचेआ लाहारी। नासोनि जांती ।।
जया नमो रक्ता तारका। जन सोडवणेचेआ मोला अमोलिका।
भूमिवैकुंठिचेया निझ्रोदका। नमो नमो ।।

(क्रिस्त पुराण 2:49:6-23)

(लुगडीं-वस्त्रे, पुणती-पुन्हां, लोहित-लाल, घाईवटु-घायाळ, तुतिया-हातोडा, सत्राणे-आवेशाने, टोपित-विंधित, संदी-सांधे, चिपुळिया-चिळकांड्या, फाराप्रति-प्रत्येक घावाला, पुत्रसोखाचे-पुत्रशोकाचे, सिहाडे-आर्तस्वर, फोंडाआंतु-खळगीत, असुध-रक्त, निझ्रोदका-निर्झरोदका)



## भग्ता सांतु आंतोनिचेआ पुणेआन परमेस्परान येकु भुर्गो जो बुडुनुं मेलालो, ताका जिवो केलो.

जेआ मुस्तेइरांतु सांतु आंतोनिची कुडि निखेपिलाली, तेआ मुस्तेइरा आसगडी येकीं विधंवी बायेलेचें घर आसिलें; तिए विधंविगेरि येकुचि पुत्रु दों ति वरुसांचो आसिलो, ताची माये येकि दिवसि सांतु आंतोनिचें सुमरण चिंतन करुंक आपुलो भुर्गो घारा निदाव्नु, इग्रजेडे वचुंक गेली, वचुंचे फुडे, घरिंचे येरझारीक तिणें येका भाणांतु उदक भरुनु दवरिलें, आणि येर सर्व घरिंचे स्वस्ताव्नु, इग्रजेडे गेली. इग्रजांतु आसतनां, भोव् वेळु तिका लागलेआ पासावत, घारांतु निदाय्लालो भुर्गो जागव्णु, उबठालो, घारांतु खेळुंक गेलो, उदकान भरललेआ भाणालागी पावतचि, भितरि जरि पळे, तरि उदकांतु आपुलेआ स्वरुपाचो भुर्गो आसिललो देखिलो, देखताचि, तेआ नेणारा भुर्गेआक उदकांतु आणिएकु चेडो आससो दिसुनु, उदकांतु ताणें उडी घाली, भाण व्हड, आणी तांतुं साबार उदक आसिलेआ पासावत, तेआ उदकांतु तो भुर्गो बुडुनु मेलो; ताची आवय् इग्रजे ठाउनु, घारा येतचि, जिए कडे आपुलो चेडो निदय्लालो, थईं सामुकिचि ताकितिन वचुनु, जरि पळे, तरि थइं आपुलो चेडो नासिलो म्होणु कळवळोली, ताचिए सोधिक उताविळि जाउनु, सगळें घर धुंडाळुनु, उदकाचेआ भाणा लागी पावली, तांतुं जरि पळे तरि आपुलो चेडो बुडुनु मेललो देखिलो; देखतचि, कुल्हाळु जो केलो, तो सांगतां नये: आपुले माथें भुमिक आदळाव्नु, कपाळ पेटिलें, माथेआचे केंस हुमटाव्नु नाखुटांनीं सगळें तोंड विधारिले, रुधन आणी कुल्हाळु भोव्चि करूं लागली. तिचे बोबेक सेजारी लोकु पावलो, लोका सांगाति, तेआ मुस्तेइराचे फ्रादि मुखे पावले, समेस्त तिका बुजाइति, संभोखिति, पण तिचेआन दुख सांभाळव नां जाउनु, भोव्चि प्रकारी, सांतु आंतोनिक उलो दी. देवाचेआ भग्ता तूं माका पाव, साबारां प्रकारीं भग्ताक प्रार्थिताली; ती बापुडी जावळि सांतु आंतोनिचें सुमरण करुंक इग्रजेडे गेलली, आणी गेलेआ पासावत, तिचो भुर्गो बुडुनु मेलो, तावळि तिचेआ अकांताक पाव नासतनां सांतु आंतोनियु कय्सो रावतलो आसिलो? खिणु भरि राविलो नां, तय्सोचि तिका पावलो; कितेआ तेआ समेस्ता लोका हुजिर तिए बाय्लेचो भुर्गो जो मेलालो, तो जिवो जाव्नु, आपुलिए माये हुजिर उबठालो, आणी बोबेक आइललेआ इतुलेआ लोका हुजिर संतोसाचियो उडकियो दिव् लागलो. तें विपरित देखुनु, ताचिए आवयूक, आणी बोबेक आइललेआ लोकाक, जो अनंदु भोगलो, तेआ अनंदाक मिति ना.

(सांतु अंतोनिचीं अचर्या 2:23)

(मुस्तइरांतु-मठात, आसगडी-जवळ, इग्रजेडे-चर्चकडे, येरझारिक-वापरासाठी, भाणांतु-हंड्यात, नेणारा-अज्ञानी, साबार-पुष्कळ, सामुकिचि-लागलीच, ताकितिन-त्वरेने, फ्रादि-फ्रांसिस्कन धर्मोपदेशक , उलो-हांक, उडकियो-उड्या)



## ग्रांथिक कोंकणी (प्रचलित)

अळंकारी भास म्हाका मानना. खुबूच 'मेक-अप्' केल्ली चली जशी सुंदर दिसना तशी अळंकारांनी भरिल्ली भासूय म्हाका सुंदर दिसना. हांव भुरगो आसतना म्हाका रंगीत लुगटां आवडटालीं. मात्सो जाणटो जायना फुडें म्हजी रुच बदलली. हांव मागीर भडक रंग सोडून पातळ रंग वेंचून काडूंक लागलों. आतां धव्या रंगा भायर दुसऱ्या रंगाचें लुगट म्हाका मानना. म्हाका दिसता, मनीस जसो-जसो संस्कारी जायत वता तसो-तसो तो सादोय जायत वता. भाशेकूय होच नेम लागू जाता. संस्कारी मनशाची भास ताच्या भेसा वरी सादी, निवळ आनी 'लक्षांत भरना असली' आसूंक जाय. भास मनशाक वेगळी केळोवची पडना. ती ताच्या व्यक्तित्वा वांगडाच केळत वता.

('वेळेवयल्यो घुलो' ले.रवीन्द्र केळेकार पृ.47)

## चित्पावनी कोंकणी

त्यांणीन पोंतेचां तोण्ड थोंडां सैल केलेंवर पोंतेणथी किडें मुङ्ग्यों बांहेर पडल्यों. तीं तेंनला धरणेंला खूंप झंटली पंण तेंचा काईंच उप्येंग झांलो नाईं. तीं भरांभर पांवलां टांकीत घरां आंयली नीं थण्डींमुळां धंग करनीं शेंकवे बेंसली इतकेंत त्यांचे कांनावंर आंवाज़ आंयलो, "पोंतेतले जींव गेंले कें ? कितां केंलास तूं हां ? दिलेलां वचंन पांळ्ळांस नांय. एतां हें वेंळापांष्टी तूं एंक पांखरूं होंशील नि तुलां संगळे जींव किडे मुङ्ग्यों पुन्हां पोंतेंत भरवें लांगतील."

('ए डिस्क्रिप्टिव्ह स्टडी ऑफ चित्पावनी' ले. वसुधा भिडे - अप्रकाशित)

## मालवणी कोंकणी

''शिरां रे मार व्हरान् इट्यानी माकां जमिन्येक पाट कशी ती लागुंक दित नाय. दिवो मालवलो रे मालवलो की लागले रगात खावूंक. आणि त्याला रे कसलो उपाय करतलयं? त्याकां विलाज नाय म्हणान् आपलो उगी होतय मियां. इतक्यात तो सकलो कुडोपकार भेटलो आणि त्यांनी बाबा एक उपाय सांङ्गल्यान्. अगदी निजुंच्या वेळेक एक लिवंचो टांक ठेवचो आणि उज्जु ढेकणांच्या टकलेंत मारुंचो. तडफडान् पडता एका मिलटांत. हो उपाय केलंय मातर; आणि अशी झोंप येताहा म्हणतंय! मुम्बईच्या यंकटरावान् काढल्याहान म्हनतात ह्यां यंतीर.''

(कोंकणी–अहिराणी समितीचा वृत्तान्त, पृ.32)

## कुडाळी कोंकणी

एका बायीक चार झील होते. तेतूर एक झील अगदीच न्हान म्हनज़े आङ्ट्याएदोच व्हतो. एक दीस चारय भावानी मिळून फिराक जावचा ठरयल्यान आणी ते लाम्ब फिराक गेले. जाताना आङ्ट्याएद्या झिलान साङ्ल्यान, ''हामी थोडे थोडे वस्तू घेऊया.'' थोडे फुडे गेल्यार योक येपारी ज़गल्यो इकी व्हतो. आङ्ट्याएद्या माणसान तितुर्ली ज़गाल घेतली. फुडे दोन सुपा, राजू आणी याक गाडाव घेऊन ते चार, सगळे वोस्तू आणी ते बसान एका मोट्ट्या जङलात गेले.

(जगाल–नांगराचा फ़ाळ, सुपा–धान्य पाखडण्याची सुपे, राजू–दोर)

(सर्व्हे ऑफ मराठी डायलेक्ट्स, खंड 2, पृ.65)

## बारदेशी ख्रिश्चन कोंकणी

कॉण येका मुनशाक दॉग पुत आललॅ. ताणें पोऽयल्या सॉरशें योव्न मुळ्ळें, ‘‘पुता, वॉच आनि मोजा दाकांचा मॉळ्यान्त आज वाव्र कोऽर.’’ ‘‘ना, वॅच्चोना,’’ ताणें मुळ्ळें. पण उपरान्त ताणें मॉन बोदोल्लें आनि गॅलो. मागिर दूसऱ्या सॉरशें वोचुन तशेन्च साङ्गलें. पुण ताणें पोर्ति पाळुङ् मुळ्ळें.’’ वॅतां सायबा, पुण गॅलॉना.

‘‘या दोगां बितुर कॉणें बापायची खोशी केली?’’ ताणि मुळ्ळें ‘‘पोऽयल्यान’’!

(दाकांचा -द्राक्षांच्या, पोऽयल्या सॉरशें-पहिल्या जवळ, पोर्ति पाळुङ्-उत्तरादाखल)

## गोमंतकी सारस्वत कोंकणी

एक आशिल्लॉ भट आनि एक आशिल्ली भटीन. तङ्का आशिल्ल्यो तीन चलियो. त्यो च़ोंच़री आशिल्ल्यो. भट तान्च़ें लग्न कोरूंक सोत्तालॉ पुण तीं च़ोंच़री आशिल्यान तान्च़ें लग्न जमनाशिल्लें.

एक दिस तांङ्कां पळोवपाक येंवचेले आशिल्ले मणुन भटान बुर्ग्यांक साङगलें, ‘‘तुमि मदी कांइच उलोउनकात.’’ ठरिलेप्रमाणे च़लियांक पोळोवपाक लोक आयले. सगळेजन जेउंक बसले. भटणिन च़लियांङ्क वाडुंक धाडले आनि कांइच़ उलोउनकात मणुन सांङ्ग.

(च़ोंच़री-तोतरी, पळोवपाक-पाहण्यास)

## साष्टी ख्रिश्चन कोंकणी

आमचे जीवितान्स सोसनी काय अॅकदम गोरज़ेची. सोसनी काय तोर ना आमचे जीविता जायतें वाऽयट येउङ् सकता. बो करुन गॉराब्यान्त सोसनी काय आसोङुच जाय. बाय्लेक त सोसनी काय ना गॉवात् पुण आसोड्क जाय. यॅ वॅळार सॉक्रातिसाचो मका उगडास यॅता सॉक्रातिस वॉळ्ळो मुनिस तॉ, पुण सोसनी काय ताजॅ जीविताओर बोरपुर आसले. पुण तॅजॅ बाय्ल ज़ाउन आसली एक वॉळ्ळो दॅंवचार. सोसनी काय तिका कांइच्च नासली. एक दिस ऑश घळ्ळें की सकाणि उट्टांच तिने आपले पॅम्परे सुरू कॅलें.

(सोसनी–सोशिकपणा, बो करून–बहुतकरुन, गॉराब्यान्त–कुटुंबात, गॉवात–पुरुषांत, उगडास–आठवण, दॅंवचार–जखीण, पॅम्परे–पिरपिर)

## काणकोणी कुणबी कोंकणी

एक दिस अशीच एक बाय्ल नेण्टे भुर्ग्याक घेउन वयताली. ते भुर्गे एकसारके रड्टाले. त्या वाटेन हो म्हातारे पोर वयतालो. त्याक पळयतरीच फकाणानी त्या बायलेन हॅक म्हणलें, ''आरे बाबा हॅगे कान कातर.'' तरि पुण तें पॉर थाम्न जालें. परत एकपट त्या बायलेन तशेंच मणलें. तरिकाय ते भुर्गे रडचे थामल्ना. कान कातर अशे तीन पटी मण्टरीच्च म्हातारे पॉरा खरें दिसलें. आणि तेनि पॉरा कानच कापले. ती बायल आणि तेगे पॉर बॉब मारु लागली.

(फकाणानी–थट्टेने)

(सर्व्हे ऑफ मराठी डायलेक्टस, खंड 5, पृ.79)

## गावडी कोंकणी

दोन माजरां आहलीं. तीं दॉगानि जॉगडाँ लागलीं कि तॅङ्का एक बाकरी मेळ्ळी. तीं जॉगॉट्टास्ताना एक माकोड एयलॉ आनि इन्चारपा लागलॉ, ''तुमि कितॅ ज़ॉगॉट्टाय?'' तँ मुणपा लागलँ, ''आपणां पोयलँ मॅळ्ळां.'' आनि तँ मुणपा लागलँ,'' आपणां पोयलँ मॅळ्ळा.'' माकडान काळ्ळॅ, दोन कुडकॅ कॅलॅ आनि एक ऑळ्ळॉ कॅलॉ. तॉ मुणपा लागलॉ, ''एक ऑळ्ळॉ जाला'' मुण. आपण गांस मात्तां कुडकॉ काट्टा. ऑ ऑळ्ळॉ ज़ालॉ. ॲच्चॉ कुडकॉ काट्टा. ऑ ऑळ्ळॉ ज़ालॉ ॲच्चॉ कुडकॉ काट्टा. ॲशँ कोन कोन बाकरी काबुर जाय्त एयली. इल्लॉसॉ उल्लॉ. माकोड मुणपा लागलॉ, ''आपणा फ़ी ना''. आनि उल्लॉ तॉ फायलॉ.

(कुडकॉ–तुकडा, ऑळ्ळॉ–मोठा, फायलॉ–खाल्ला)

(डिस्क्रिप्टिव अर्नॅल्विसिस ऑफ गावडी. ले. पुष्पा कारापुरकर)

## कारवारी सारस्वत कोंकणी

ॲका ग्रिहस्ताक दॉगजाण पूत आशिल्लॅ. तान्तुलेपैकी सानु आपणागेल्या बापसुकडे म्होणचॉ लागलॉ, ''आन्नां, मागेल्या वाण्टयाक येंवाचि तितली आस्ति माक्का दी.'' आनिं तान्नँ आपणागेलि आस्ति तांका वाण्टुनु दिली. आनिं थोडेचि दिवसांनि सानपूतु आपणागेलि आस्ति सर्व येकडे कोऽर्नुं धूरेऽक गावांक वचु गॅलॉ, आनिं यइं वाइट चाल्लिनँ आपणागॅलॉ पैसॉ सर्व वाइट कॅल्लॉ. आनिं सर्व खर्चनाफुडॅ त्या गावान्तु होऽड दुश्कालु पळ्ळॉ, आनिं ताक्का गरज पळ्ळी. आनिं तॉ त्या गांवच्या ॲक ग्रिहस्ताकडे कामाक राबलॉ.

(आस्ति–संपत्ती, धूरेऽक–दूरच्या)

(लिंग्विस्टिक सर्व्हे ऑफ इंडिया, खंड 7, पृ.192)




## भटकळी नवायती कोंकणी

तेदवां तेचो मोऽटो पुतूस गाद्यान्त होऽतो. तोऽ गाद्यान्तुशिं घरालागिं येतांवरि गांव
आनिं नाचूंचं आइकलान. तेदवां तेना एका चाकराला आपइलान आनिं इचारलान, "हि
काय होतेंऽशे?" तेदवां तेना तेला ब्रोल्लान, "तुजोऽ भावूस आयलोशे आनिं तुज्या बापाशीं
एऽक जेवाण देलान; कित्याखातिर बोल्ल्यार, तोऽ चोकोऽट शेऽवन आय्लो." तेदवां तेका र
आयलो, घरान्त जाय्ना जाय्लो.

(लिंग्विस्टिक सर्व्हे ऑफ इंडिया, खंड 7, पृष्ठ 20

## मंगळूरी चित्रापूर-सारस्वत कोंकणी

एऽक दीस सकांऽळिं राऽमु खान्ध्याऽर कुराऽडि घालनु लाऽकडं फोडोंचँ म्होऽणु रान्नांऽ
वजगेलॉ. रान्नांऽतुं तळ्याकाठाऽरि ताक्का ऍक हॉड झाड दिसलँ. त्या झाडांऽच थॉड्यॉ हॉ
फान्द्यॉ सुक्कुन गेल्लिल्यॉ. तँ पोळोऽनु राऽमु म्हणालॉ, "आऽजि इत्ल वग्गीचि बरँ लाकु
मॅळ्ळँ. आऽजि दीवस बरो अस्स. पुरयि फान्द्यॉ युण्टयलॅरि आऽजि पयशेयि मस्त मॅळतलॅ.

(सर्व्हे ऑफ मराठी डायलेक्टस, खंड 8, पृ.98

## कासरगोडी मराटो कोंकणी

येऽके गावाऽन्तं येऽके मानुसे उन्तॉ. तॅल्ले आऽट लॉङ्का दाकळि उन्ति. ति कॉद्दा
लडायि करीतं उन्ति. तँ माणसाले प्राऽयि जालि. तॅच्चॅ दाकळ्यान्स बुदु साङगत्ला. ति आय्कलि
नाऽयि. येकदि तॉ जर्ण्डॉ मरॉळे वोताना तॅच्चॅ पुताले आगोऽर्नु येके काट्यॉचॉ पॅण्डॉ तॅच्चॅ गो
दॅऽला. देऽवुणु तॉ पॅण्डॉ मोऽडुले साङगत्ला. तॅच्चॅ पूताले तॅ मोऽड्ले जाले नायि.

(दाकळि-'मुले', प्राऽयि-वार्धक्य, आगोऽर्नु-बोलावून)

(सर्व्हे ऑफ मराठी डायलेक्टस, खंड 6, पृ.99)

## कासरगोडी कऱ्हाडी कोंकणी

एक्का रन्नाऽनु एऽक म्हान्तार सिंव्ह आच्छिलं. एऽकु दीसु तेण एक्का मदभरल्या हत्त्याऽणि झगड करताना तज्जा पायो मोळ्ळो. तज्जामाऽण बोण्टेऽक वोच्चाऽक साध्य नथ्थिल्ल्या वोत्तां आहाऽर मेळ्णस क्षीण दउनु एक्कि कडेक पण्णु तें निद्योङ ङण्णुच्छिलं. त्या सन्दर्भानु एऽकु कुदको त्या वट्टेन आइलो. ताक्किले त्या दीसु अहेऽरु मेळ्णस सोदइशिली. पायो मोण्णु पळ्ळ्या सिंव्हाऽक देक्खुनु तज्जा आशीक वोच्चुनु तत्थो क्षेमसमाचाऽरु वितार्लो.

(बोण्टेऽक-शिकारीला, कुदको-कोल्हा)

(डिस्क्रिप्टिव्ह अनॅलिसिस ऑफ कऱ्हाडी, ले.डॉ.वि.वा.परांजपे- अप्रकाशित)

## केरळी कुडुंबी कोंकणी

एक्किली आम्माऽ तिगे चोड्डाऽ हाऽणो दित्ताऽलि. ते चोड्डाऽणि हाऽणो हाम्नास्सोऽणो सिद्दाऽन्तो आराम्बीलि. ताङगा लाग्गीचि एक्कलें माज्जोऽरो आशशीलें. आम्मांऽणि ते माजूराऽलाग्गि ते चोड्डाऽको बिस्सिडिच्चे साङ्गीलें. माजराऽणि तें आय्कान्नाऽ. सूर्णॅलाग्गि ते माज्जाराऽ बिस्सिडिच्चे साङगीलें. सूर्णॅऽणि तें आय्कान्नाऽ. बोड्डीणिऽ लाग्गि ते सूर्णे माऽरि मुणु साङगीलें. बोड्डीणि ते आय्कान्नाऽ. उज्जाऽ लाग्गि ते बोड्डिया लास्सी मुणु साङगीलें. उज्जाऽणि तें आय्कान्नाऽ.

(चोड्डा-मुलांस, हाऽणो-अन्न, हामनास्सोऽणो-न खाता, सिद्दाऽन्तो-खोडकरपणा, बिस्सिडिच्चे-भिवविण्यास) (सर्व्हे ऑफ कोंकणी इन केरला. ले.कु.राजथी पृ.328)

## केरळी गौड-सारस्वत कोंकणी

एक्कर्ड खऽयिं एऽकि गुर्बेऽजि अस्सिल्लि अनीक एऽकु कायळॉ. कायळ्याऽन शेऽण पुञ्जाऽलँ गुर्बजे:न मॅण. दोग्गानीयिं घऽरं केल्लिं. कायळ्याऽन सांङ्गीलँ-, ''व्होळ्ळें एक वोऽत एवॉ, गुर्बजेऽलँ घऽर कोऽळ्नु वोच्चॉ.'' गुर्बजेऽन साङ्गीलँ, ''व्होळ्ळॉ एऽकु पाऽव्सु एवॉ, कायळ्यालँ घऽर व्होऽळ्नु वच्चॉ.''

(गुर्बेऽजि-चिमणी, वोऽत-ऊन) (सर्व्हे ऑफ मराठी डायलेक्टस, खंड 4, पृ.85)



# प्रमुख संदर्भ ग्रंथ

1. अ.भा. कोंकणी साहित्य परिषद :
A Brief Note on Konkani Language and Literature

2 कत्रे, सु.मं. : The Formation of Konkani

3. गोमिश, ओलिव्हीन्यू : कोंकणी सरस्पतिचो इतिहास

4, ग्रियर्सन, जॉ.अ.: Linguistic Survery of India Vol. VII

5, घाटगे, अ.मा. : Survery of Marathi Dialects, Vols.I to VIII

6, तुळपुळे शं.गो. : प्राचीन मराठी कोरीव लेख

7 प्रभुदेसाई वि.बा. : सतराव्या शतकांतील गोमंतकी बोली.

8 प्रियोळकर अ.का.: ग्रांथिक मराठी भाषा आणि कोंकणी बोली

9. शणै गोंयबाब: कोंकणिची व्याकरणी बांदावळ

10. सातोस्कर बा.द.: गोमंतक: प्रकृति आणि संस्कृति, खंड 1, 2, 3

## डॉ. सुधाकर बाळकृष्ण कुळकर्णी

**(1934 - 2001)**

30 जून, 1934 रोजी तळे, जि. रायगड येथे जन्म. प्राथमिक शिक्षण गावात. गाव सोडून मुंबई. दिवसा कारखान्यात नोकरी करून रात्रीच्या शाळेत शिक्षण. मॅट्रिक उत्तीर्ण. कंपाऊंडर, कंडक्टर, वायरमन, सेल्समन, कारकून इ. मिळेल ती नोकरी पत्करून मराठी व इंग्रजीत एम्. ए. (मुंबई विद्यापीठ).

नंतर डॉ. अ. का. प्रियोळकर यांच्या मार्गदर्शनाखाली भाषाविज्ञान विषयाभ्यास. नोकरी करत-करत 1963 साली भाषाविज्ञान पदव्युत्तर पदविका पूर्ण. 1964 साली पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागातील बोली प्रकल्पावर संशोधन-सहाय्यक म्हणून नेमणूक. महाराष्ट्र, गोवा, कर्नाटक व गुजरात या चार राज्यांतील सोळा जिल्ह्यांत भ्रमण करून त्या जिल्ह्यांतील प्रातिनिधिक ग्रामीण बोलींचे प्रत्येकी 3000 मूलभूत शब्द गोळा केले व मराठी बोलीभाषांचा कोश सिद्ध केला. याच काळात त्यांनी व डॉ. तुळपुळे यांनी ग्रॅमॅटिकल स्केच ऑफ मराठी या नावाचे मराठी व्याकरण सिद्ध केले. ज्ञानेश्वरीच्या प्राचीन शब्दकोशांची अनेक हस्तलिखिते त्यांनी जमविली. त्यातील अडीचशे वर्षांपूर्वीचा एक ग्रंथ 'ज्ञानेश्वरी टिपण' हा त्यांनी डॉ. मु. श्री. कानडे यांच्या सहकार्याने संपादित केला. तो पुणे विद्यापीठाने प्रकाशित केला.

1966-1971 या काळात पुणे येथील डेक्कन कॉलेज पोस्टग्रॅज्युएट अ‍ॅण्ड रिसर्च इन्स्टिट्यूट या संस्थेच्या 'मराठी बोली सर्वेक्षण' प्रकल्पावर डॉ. अ. मा. घाटगे यांच्या हाताखाली क्षेत्र-संशोधक म्हणून काम केले. तेथेच ■ कोंकणी ऑफ काणकोण ■ वारली ऑफ ठाणे ■ मराठी ऑफ कारसगोड ■ कोळी ऑफ रायगड ■ भिली ऑफ डांग हे ग्रंथ सिद्ध केले. तेथे नोकरी करतानाच भाषाविज्ञान विषयात एम्. ए. व पी. एच्. डी पदव्या संपादन केल्या. डिस्क्रिप्टिव्ह अ‍ॅनॅलिसिस ऑफ कातकरी डायलेक्ट ह्या पी. एच. डी. प्रबंधाला 'मेजर कॅण्डी पारितोषिक' देऊन डेक्कन कॉलेजने त्यांचा गौरव केला. पुढे पश्चिम विभागीय भाषा केंद्रात, पुणे येथे मराठी भाषेचे अधिव्याख्याते. तेथेच अ-मराठी भाषिकांना मराठी भाषा शिकविण्यासाठी मराठी फोनेटिक ड्रिल्स पुस्तिका सिद्ध केली.

जून 1973 पासून नागपूर विद्यापीठात भाषाविज्ञानाचे प्रपाठक व नंतर विभाग प्रमुख, 1976 पासून या विद्यापीठाच्या भाषाविज्ञान, परकीय भाषा विभागाचे प्रमुख. तेथे भाषाविज्ञानाबरोबरीनेच जर्मन, फ्रेंच, रशियन, इंग्रजी तसेच तेलगु, बंगाली यांच्या प्रसारासाठी पुढाकार.

**ग्रंथसंपदा :** ■ सर जमशेटजी जिजीभाई (1966) ■ ज्ञानेश्वरीचा प्राचीन शब्दकोश (1968) ■ मराठी व्यक्तिनाम कोश (1972) ■ पोवारी बोली (1974) ■ ग्रॅमॅटिकल स्केच ऑफ मराठी (1975) ■ भिली ऑफ डांग्ज (1976).

आदिवासींच्या भाषा, लोकसाहित्य व जीवनपद्धती यांचे गाढे अभ्यासक व व्यासंगी. त्यांच्या मार्गदर्शनाखाली अनेक विद्यार्थ्यांनी पी. एच्. डी. प्राप्त केली आहे. भाषाविज्ञान विषयक राज्यस्तरीय व राष्ट्रीय संस्थांचे सदस्य.

दि. 29 ऑक्टोबर 2001 रोजी निधन. दोन मुली, एक मुलगा असा परिवार.



भाषिक वाद हे केवळ भाषिक वाद कधीच नसतात. ते लाक्षणिक असतात. त्यांच्या पाठीशी सामाजिक, वांशिक, सांस्कृतिक, भौगोलिक, ऐतिहासिक, राजकीय, आर्थिक इ. क्षेत्रांतील दीर्घकालीन असंतोष वा स्पर्धा कारणीभूत असते. दोन लोकसमूहांतील संघर्षाचे ते दृश्यरूप असते एवढेच ! कोंकणी-मराठी कलहाचे मूलबीज त्या लोकसमूहांच्या वसाहतकालीन स्पर्धेत शोधता येते. या स्पर्धेला तीन सहस्त्र वर्षांचा इतिहास आहे. हा वाद जसा मराठी समाजाशी आहे; तसाच तो कानडी, उडपी, केरळी समाजांशीही आहे. अन्याय आणि अवरोधाच्या विरोधातील ती एक स्वाभाविक प्रतिक्रिया होय.

– प्रस्तावनेतून...
डॉ. सु. बा. कुळकर्णी